


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

ऑक्टोबर ते डिसेंबर २०१६

…० व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. अक्षयकुमार काळे

अनुक्रमणिका











अंक क्र. ३५७, ऑक्टोबर ते डिसेंबर २०१६



संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**







प्रकाशक

**प्रकाश पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)



अनुक्रमणिका








मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

जाहिरात समन्वयक
**शिरीष चिटणीस**

व्याकरण सल्लागार
**माधव राजगुरू**

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

मुद्रितशोधन
**अशोक देव**

मुद्रणस्थळ
**पुणे विद्यार्थी गृह,**
महाराष्ट्र मुद्रणशाळा छापखाना
सदाशिव पेठ, पुणे
४११०३०.

**मूल्य : १५ रुपये**

प्रकाशन क्र. ३५७
ऑक्टोबर-डिसेंबर २०१६



# अं त रं ग


- संपादकीय : ग्रामीण साहित्याचा आधारवड कोसळला... **पुरुषोत्तम काळे** / ३

**श्रद्धांजली**

- आनंद यादव : शेती, माती आणि शेतकरी : **भास्कर ढोके** / ५
- लेखनव्रती वि. ग. कानिटकर : **मंगला गोडबोले** / १०
- आदिवासींच्या प्रश्नांसाठी रस्त्यावर उतरणारी लेखिका : महाश्वेतादेवी : **आबासाहेब सरवदे** / १४

**लेख**

- अभिजात वृत्ती आणि चिकित्सक समीक्षेचा आदर्श : डॉ. अक्षयकुमार काळे : **प्रमोद मुनघाटे** / ७
- मराठी संतकवितेला कन्नड शरणधारेची भेट घडविणारी विदुषी डॉ. जयदेवीताई लिगाडे : **सुहास पुजारी** / ३३
- लेखनात विरामचिन्हे हवीतच : **माधव राजगुरू** / ३८

**परीक्षण**

- काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान : **किशोर सानप** / १९
- यशवंत मनोहर यांचा 'युगांतर' जाणिवांचा कवितासंग्रह : **शैलेंद्र लेंडे** / २३
- कवितांनी भारलेली तिन्हीसांज : **संदेश ढगे** / ३१
- संशोधनाची उपयुक्त प्रणाली : **वर्षा तोडमल** / ४२
- 'रात्र, दुःख आणि कविता' : **सुरेश सावंत** / ४४
- वाङ्मयीन-सांस्कृतिक प्रवाहांचा परखड समाचार : **भालचंद्र शिंदे** / ४८

- शाखा कार्यवृत्त : **प्रकाश पायगुडे** / ५४




अनुक्रमणिका




     



संपादकीय

डॉ. पुरुषोत्तम काळे

# ग्रामीण साहित्याचा आधारवड कोसळला...

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा ३५७वा अंक सादर करताना मनामध्ये संमिश्र भावना आहेत. पहिली भावना आहे ती शोकभावना. ज्येष्ठ साहित्यिक, समीक्षक आणि अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष आनंद यादव यांचे नुकतेच निधन झाले. मराठी साहित्याच्या मुख्य धारेत ग्रामीण साहित्याचा प्रवाह निर्माण करणारे आणि ग्रामीण लेखकांना प्रोत्साहन देणारे आनंद यादव हे कृतिशील साहित्यिक होते. ग्रामीण साहित्यनिर्मितीसाठी त्यांनी प्रा. रा. रं. बोराडे, प्राचार्य द. ता. भोसले, प्रा. नागनाथ कोत्तापल्ले, भास्कर चंदनशिव आणि वासुदेव मुलाटे यांच्यासमवेत ग्रामीण साहित्य चळवळीची उभारणी केली. ग्रामीण लेखकांच्या साहित्यनिर्मितीमधील कसदारपणा वाढावा यासाठी आनंद यादव आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी ग्रामीण साहित्य संमेलन आणि लेखकांसाठी कार्यशाळा घेतल्या. भारती विद्यापीठाचे संस्थापक आणि कुलपती मा. डॉ. पतंगराव कदम यांच्या सहकार्याने भारती विद्यापीठ, पुणे येथे १९७७ साली पहिले ग्रामीण साहित्य संमेलन आयोजित करण्यात आले. महात्मा जोतिबा फुले, लोकहितवादी, न्या. रानडे, 'सुधारक'कर्ते आगरकर, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे, विज्ञाननिष्ठ स्वातंत्र्यवीर सावरकर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महात्मा गांधी, महर्षी धोंडो केशव कर्वे, छत्रपती श्रीमंत शाहू महाराज, कर्मवीर भाऊराव पाटील इत्यादींचे विचार आत्मसात करून ग्रामीण साहित्य संकल्पनेचा विचारव्यूह आनंद यादवांनी आकाराला आणला.

महानगरीय साहित्यापेक्षा कृषिकेंद्रित ग्रामजीवनाला साहित्यातून मुखर करणारा ग्रामीण साहित्याचा प्रवाह स्वतंत्र आणि बहुजननिष्ठ आहे. वंचित आणि अभावग्रस्त ग्रामसमूहमानस, वास्तवता, निसर्गशरणता आणि आदिमतेचे अनुसरण करणारे ग्रामजीवन ग्रामीण साहित्यामध्ये जोरकसपणे व्यक्त होऊ लागले. ग्रामीण साहित्याची चळवळ गतिशील करीत असतानाच यादव श्रेष्ठ दर्जाची साहित्यनिर्मितीही करीत होते. खळाळ, 'आदिताल', 'उखडलेली झाडे', 'डवरणी' यांसारखे कथासंग्रह; 'हिरवे जग', 'मायलेकरं' यांसारखे कवितासंग्रह आणि 'गोतावळा', 'नटरंग' यांसारख्या कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. 'झोंबी', 'नांगरणी', 'घरभिंती', 'काचवेल' या कादंबऱ्यांतून स्वतःचे आत्मचरित्र त्यांनी मांडले. मराठी साहित्यात आत्मचरित्रात्मक कादंबरी हा प्रकार त्यांनी रूढ केला. लघुनिबंध या साहित्यप्रकाराची समीक्षा करून त्याचे जनकत्व वि. स. खांडेकरांकडे दिल्याने ना. सी. फडके यांच्याशी यादवांचा वादही झाला.

शिक्षण-व्यवसायानिमित्त शहरात आलेले ग्रामीण युवक आपले अनुभव लेखनातून व्यक्त करू लागले. या ग्रामीण युवकांना लिहिते करण्यासाठी आनंद यादवांनी ग्रामीण साहित्य संमेलने, लेखकांसाठी कार्यशाळा आणि व्याख्यानांद्वारे मार्गदर्शन केले. 'झोंबी'ला 'साहित्य अकादमी' पुरस्कार मिळाला आणि यादवांना विद्वतमान्यतेबरोबरच लोकमान्यताही मिळाली. महाबळेश्वर येथील 'अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलना'च्या अध्यक्षपदी बहुमताने निवडून येऊनही त्यांना दुर्दैवी वादामुळे राजीनामा द्यावा लागला. याची खंत आम्हा पदाधिकाऱ्यांसह मराठी साहित्यरसिकांना वाटली. या निमित्ताने अभिव्यक्ती स्वातंत्र्याचा प्रश्न हिरिरीने चर्चिला गेला.

आनंद यादवांनी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा ग्रामीण



अनुक्रमणिका



साहित्य विशेषांक संपादित केला होता. साहित्य रसिकांच्या अंतःकरणात आपल्या साहित्याने आणि मर्मग्राही समीक्षादृष्टीने आपले स्थान निर्माण करणाऱ्या आनंद यादवांना भावपूर्ण श्रद्धांजली!

यादवांअगोदर ज्येष्ठ साहित्यिक वि. ग. कानिटकर यांचे निधन झाले. रूढ साहित्यप्रकारांना टाळून चरित्र आणि इतिहासलेखनाद्वारे आंतरराष्ट्रीय घटना आणि व्यक्ती यांच्यावर कानिटकरांनी आपल्या लेखनातून भाष्य केले. सर्वांना उमजेल अशी सुबोध, रंजक शैली त्यांनी वापरल्याने त्यांचे साहित्य समाजाच्या सर्व स्तरांमध्ये लोकप्रिय झाले. दुर्दैवाने समीक्षकांनी त्यांच्या साहित्याची विशेष दखल घेतली नाही. आंतरराष्ट्रीय राजकारण, घटना आणि प्रभावशाली व्यक्तींवरील कानिटकरांचा व्यासंग वाखाणण्याजोगा होता. 'माणूस'मध्ये श्री. ग. माजगावकरांच्या प्रेरणेने सुरू झालेली 'नाझी भस्मासुराचा उदयास्त' ही लेखमालिका 'राजहंस प्रकाशन'ने ग्रंथस्वरूपात प्रकाशित केली. आजवर पंचवीसच्या वर आवृत्त्या या ग्रंथाच्या निघाल्या आहेत. विन्स्टन चर्चिल, अब्राहम लिंकन यांची चरित्रे आणि 'व्हिएतनाम अर्थ आणि अनर्थ' हे त्यांचे ग्रंथ रसिकमान्य झाले. कानिटकरांनी मराठीतील गाजलेल्या ग्रंथांच्या प्रस्तावनांचे संपादन केले. मराठी साहित्यात अशा प्रस्तावनांची दीर्घ आणि समृद्ध परंपरा आहे. या प्रस्तावना संक्षिप्त करून आणि त्यांना ग्रंथरूप देऊन कानिटकरांनी मौलिक काम केले आहे. गंभीर विषयांवर अभ्यासपूर्ण लेखन करणारे वि. ग. उत्तम विनोदी लेखक होते. 'माणूस' साप्ताहिकात त्यांनी मुक्ताफळे नावाचे विनोदी सदरदेखील चालविले. रुग्णशय्येवर असतानादेखील ते वाचन-लेखनात रमलेले होते. शेवटच्या काळात ते 'अस्वस्थ हिंदूमन' या पुस्तकाच्या अनुवादात व्यस्त होते. लेखनावर अव्यभिचारी निष्ठा असणाऱ्या या थोर साहित्यिकास भावपूर्ण श्रद्धांजली!

या अंकात आनंद यादव, वि. ग. कानिटकर आणि ज्ञानपीठविजेत्या महाश्वेतादेवी या दिवंगत साहित्यिकांच्या व्यक्ती आणि वाङ्मयाचा आढावा घेणारे लेख आहेत. कवी गणेश शिवाजी मरकड, सतीश सोळांकूरकर आणि कवयित्री अंजली कुलकर्णी यांच्या काव्यसंग्रहांवरील परीक्षणे आहेत. रा. ना. चव्हाण यांच्या ग्रंथावरील भालचंद्र शिंदे यांचा लेख रसिकांच्या पसंतीस उतरेल.

डोंबिवली येथे होणाऱ्या ९० व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी ख्यातकीर्त समीक्षक डॉ. अक्षयकुमार काळे यांची निवड झाली. अविचल निष्ठेने समीक्षा करणाऱ्या डॉ. अक्षयकुमार काळे यांची अध्यक्षपदी झालेली निवड ही आनंदाची बाब आहे. डॉ. अक्षयकुमार काळे यांचे हार्दिक अभिनंदन! डॉ. काळे यांच्या साहित्यसमीक्षेवरील डॉ. प्रमोद मुनघाटे यांचा लेख या अंकात घेतला आहे. ज्येष्ठ गांधीवादी आणि कन्नड मराठी भक्तिधारेच्या समन्वयक डॉ. जयदेवीताई लिगाडे यांच्यावरील डॉ. सुहास पुजारी यांचा लेख जयदेवीताईंच्या साहित्यकर्तृत्वाचा परिचय रसिक वाचकांना करून देईल. शरणसाहित्याच्या अभ्यासक असलेल्या जयदेवीताईंनी कन्नड भाषेबरोबरच मराठीतही साहित्यनिर्मिती केली आहे. डॉ. शकुंतला क्षीरसागर यांच्या 'प्रबंध लेखनाची पद्धती' या महत्त्वाच्या पुस्तकावर डॉ. वर्षा तोडमल यांचा लेख या पुस्तकाचे महत्त्व पटवून देईल. प्रबंधलेखन करू इच्छिणाऱ्या प्रत्येक संशोधकाने संग्रही ठेवावे असे हे पुस्तक आहे.

गेल्या दोन अंकांप्रमाणे या अंकाचेही रसिकांकडून भरभरून स्वागत होईल अशी अपेक्षा व्यक्त करतो. म. सा. पत्रिका अधिकाधिक निर्दोष स्वरूपात निघावी यासाठी संपर्क साधून मौलिक सूचना करणाऱ्या विचक्षण वाचकांचे आभार! सर्व सूचनांची दखल घेऊन त्यावर कार्यवाही होईल असे अभिवचन देतो.

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)



अनुक्रमणिका





श्रद्धांजली

प्रा. डॉ. भास्कर ढोके

# आनंद यादव : शेती, माती आणि शेतकरी

१९७५च्या दरम्यान आनंद यादवांनी ग्रामीण साहित्याला चळवळीचे स्वरूप देण्याचा प्रयत्न सुरू केला, आणि त्यात त्यांना अपेक्षित यशही आले. ग्रामीण साहित्याच्या चळवळीला 'वाङ्मयीन प्रवाहाचे' रूप देण्यात या चळवळीचा निर्विवाद सहभाग होता. इतर कुठल्याही भारतीय भाषेमध्ये ग्रामीण साहित्याकडे वेगळा वाङ्मयीन प्रवाह म्हणून पाहिले जात नाही. यादवांनी मराठीत हे करून दाखवले.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा जुलै-डिसेंबर १९८१चा अंक ग्रामीण विशेषांक म्हणून प्रसिद्ध झाला होता. त्या अंकाचे संपादक होते आनंद यादव. वयाच्या ८३व्या वर्षी त्यांचे वृद्धापकाळाने निधन झाले. मराठी साहित्यातले एक पर्व संपले. मराठी साहित्याचे ऐतिहासिक कालखंड करायचे ठरवले तर ८०चे दशक हे आनंद यादवांच्या नावाने ओळखले जायला हरकत नाही. १९७१ ते १९९२ हा सर्वसाधारण त्यांचा लेखनाचा कालखंड. १९७१ मध्ये त्यांची 'गोतावळा' ही कादंबरी आली. मराठीतील काही चांगल्या कादंबऱ्यांतली एक, एवढेच तिचे वेगळेपण नव्हते, तर 'गोतावळा' ही खऱ्या अर्थाने पहिली ग्रामीण कादंबरी होती. कृष्णराव भालेकर यांच्या 'बळीबा पाटील'चा पहिली ग्रामीण कादंबरी म्हणून उल्लेख केला जातो, तो खराही आहे. भालेकरांनंतरही काही ग्रामीण पार्श्वभूमी असलेल्या कादंबऱ्या लिहिल्या गेल्या, परंतु सर्वार्थाने पहिली ग्रामीण कादंबरी गोतावळाच आहे. याचे कारण असे, की 'गोतावळा'ने ग्रामीण पार्श्वभूमीपेक्षा ग्रामीण जीवनाचा अनुभव महत्त्वाचा मानला, ग्रामीणतेपेक्षा अनुभवात्मकता अधिक महत्त्वाची मानली.

काळाच्या ओघात बदलत जाणारे वास्तव शहरीकरणाचे वाहू लागलेले वारे पाश्चात्त्य पद्धतीच्या भांडवली आधुनिकतेची चाहूल 'गोतावळा'तून सर्वप्रथम दिसली. गोतावळाने एका अर्थाने कृषिसंस्कृतीच्या पराभवाची कथा मांडली. साहित्य समाजाचा आरसा असते, हे वाक्य वाचायला छान वाटतं, पण प्रत्यक्षात मात्र या आरशात डोकावणे ही अवघड गोष्ट असते. महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाल्यानंतर मराठी जीवनात अनेक स्थित्यंतरं होत होती. खेडी आणि शहरे यांच्यातील अंतर कमी होत होते. माडगुळकरांच्या 'सर्व्हिस मोटार'ने शहरी संस्कृतीचे खेड्यावर- कृषिसंस्कृतीवर होणाऱ्या अतिक्रमणाचे सूचन केले होते. एका अर्थाने कृषिसंस्कृती एका उत्क्रांतीच्या टप्प्यावर उभी होती, व्यावसायिक वळणावर उभी होती. हे वळण आनंद यादवांनी 'गोतावळा'तून नेमकेपणाने टिपले. म्हणूनच 'गोतावळा' हा सामाजिक उत्क्रांतीचा दस्तऐवज आहे. अर्थात 'गोतावळा'च्या उत्क्रांतीची पार्श्वभूमी बनगरवाडी, धग आणि पाचोळाने अगोदरच निर्माण करून ठेवली होती.



१९७५च्या दरम्यान आनंद यादवांनी ग्रामीण साहित्याला चळवळीचे स्वरूप देण्याचा प्रयत्न सुरू केला, आणि त्यात त्यांना अपेक्षित यशही आले. ग्रामीण साहित्याच्या चळवळीला 'वाङ्मयीन प्रवाहाचे' रूप देण्यात या चळवळीचा निर्विवाद सहभाग होता. इतर कुठल्याही भारतीय भाषेमध्ये ग्रामीण साहित्याकडे वेगळा वाङ्मयीन प्रवाह म्हणून पाहिले जात नाही. यादवांनी मराठीत हे करून दाखवले आणि



अनुक्रमणिका

साहित्य विशेषांक संपादित केला होता. साहित्य रसिकांच्या अंतःकरणात आपल्या साहित्याने आणि मर्मग्राही समीक्षादृष्टीने आपले स्थान निर्माण करणाऱ्या आनंद यादवांना भावपूर्ण श्रद्धांजली!

यादवांअगोदर ज्येष्ठ साहित्यिक वि. ग. कानिटकर यांचे निधन झाले. रूढ साहित्यप्रकारांना टाळून चरित्र आणि इतिहासलेखनाद्वारे आंतरराष्ट्रीय घटना आणि व्यक्ती यांच्यावर कानिटकरांनी आपल्या लेखनातून भाष्य केले. सर्वांना उमजेल अशी सुबोध, रंजक शैली त्यांनी वापरल्याने त्यांचे साहित्य समाजाच्या सर्व स्तरांमध्ये लोकप्रिय झाले. दुर्दैवाने समीक्षकांनी त्यांच्या साहित्याची विशेष दखल घेतली नाही. आंतरराष्ट्रीय राजकारण, घटना आणि प्रभावशाली व्यक्तींवरील कानिटकरांचा व्यासंग वाखाणण्याजोगा होता. 'माणूस'मध्ये श्री. ग. माजगावकरांच्या प्रेरणेने सुरू झालेली 'नाझी भस्मासुराचा उदयास्त' ही लेखमालिका 'राजहंस प्रकाशन'ने ग्रंथस्वरूपात प्रकाशित केली. आजवर पंचवीसच्या वर आवृत्त्या या ग्रंथाच्या निघाल्या आहेत. विन्स्टन चर्चिल, अब्राहम लिंकन यांची चरित्रे आणि 'व्हिएतनाम अर्थ आणि अनर्थ' हे त्यांचे ग्रंथ रसिकमान्य झाले. कानिटकरांनी मराठीतील गाजलेल्या ग्रंथांच्या प्रस्तावनांचे संपादन केले. मराठी साहित्यात अशा प्रस्तावनांची दीर्घ आणि समृद्ध परंपरा आहे. या प्रस्तावना संक्षिप्त करून आणि त्यांना ग्रंथरूप देऊन कानिटकरांनी मौलिक काम केले आहे. गंभीर विषयांवर अभ्यासपूर्ण लेखन करणारे वि. ग. उत्तम विनोदी लेखक होते. 'माणूस' साप्ताहिकात त्यांनी मुक्ताफळे नावाचे विनोदी सदरदेखील चालविले. रुग्णशय्येवर असतानादेखील ते वाचन-लेखनात रमलेले होते. शेवटच्या काळात ते 'अस्वस्थ हिंदूमन' या पुस्तकाच्या अनुवादात व्यस्त होते. लेखनावर अव्यभिचारी निष्ठा असणाऱ्या या थोर साहित्यिकास भावपूर्ण श्रद्धांजली!

या अंकात आनंद यादव, वि. ग. कानिटकर आणि ज्ञानपीठविजेत्या महाश्वेतादेवी या दिवंगत साहित्यिकांच्या व्यक्ती आणि वाङ्मयाचा आढावा घेणारे लेख आहेत. कवी गणेश शिवाजी मरकड, सतीश सोळांकूरकर आणि कवयित्री अंजली कुलकर्णी यांच्या काव्यसंग्रहांवरील परीक्षणे आहेत. रा. ना. चव्हाण यांच्या ग्रंथावरील भालचंद्र शिंदे यांचा लेख रसिकांच्या पसंतीस उतरेल.

डोंबिवली येथे होणाऱ्या ९० व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी ख्यातकीर्त समीक्षक डॉ. अक्षयकुमार काळे यांची निवड झाली. अविचल निष्ठेने समीक्षा करणाऱ्या डॉ. अक्षयकुमार काळे यांची अध्यक्षपदी झालेली निवड ही आनंदाची बाब आहे. डॉ. अक्षयकुमार काळे यांचे हार्दिक अभिनंदन! डॉ. काळे यांच्या साहित्यसमीक्षेवरील डॉ. प्रमोद मुनघाटे यांचा लेख या अंकात घेतला आहे. ज्येष्ठ गांधीवादी आणि कन्नड मराठी भक्तिधारेच्या समन्वयक डॉ. जयदेवीताई लिगाडे यांच्यावरील डॉ. सुहास पुजारी यांचा लेख जयदेवीताईंच्या साहित्यकर्तृत्वाचा परिचय रसिक वाचकांना करून देईल. शरणसाहित्याच्या अभ्यासक असलेल्या जयदेवीताईंनी कन्नड भाषेबरोबरच मराठीतही साहित्यनिर्मिती केली आहे. डॉ. शकुंतला क्षीरसागर यांच्या 'प्रबंध लेखनाची पद्धती' या महत्त्वाच्या पुस्तकावर डॉ. वर्षा तोडमल यांचा लेख या पुस्तकाचे महत्त्व पटवून देईल. प्रबंधलेखन करू इच्छिणाऱ्या प्रत्येक संशोधकाने संग्रही ठेवावे असे हे पुस्तक आहे.

गेल्या दोन अंकांप्रमाणे या अंकाचेही रसिकांकडून भरभरून स्वागत होईल अशी अपेक्षा व्यक्त करतो. म. सा. पत्रिका अधिकाधिक निर्दोष स्वरूपात निघावी यासाठी संपर्क साधून मौलिक सूचना करणाऱ्या विचक्षण वाचकांचे आभार! सर्व सूचनांची दखल घेऊन त्यावर कार्यवाही होईल असे अभिवचन देतो.

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)







मराठी साहित्याच्या चर्चेत ग्रामीण साहित्याला मध्यवर्ती स्थान प्राप्त करून दिले. अरविंद वामन कुलकर्णी यांच्या भाषेत सांगायचे झाले, तर काळीचे साहित्य हे खरे प्रातिनिधिक मराठी साहित्य आहे, 'पांढरीचे नाही' हे यादवांनी जगाला पटवून दिले.

केवळ पार्श्वभूमी म्हणून कवितेत येणारी कृत्रिम शेती-मातीची वर्णने, नाटकीयता, अनुभवांचा खोटेपणा, कृषिसंस्कृतीतील संवेदनांचा अभाव आणि नाट्यात्म सहानुभूतीत अडकलेल्या मराठी ग्रामीण कवितेला 'हिरवे जग'मधून त्यांनी लगाम लावला. अस्सल शेती-मातीची अनुभूती त्यांच्या या कवितांमधून प्रथमच समोर आली. नेमाडे मांडत असलेल्या देशीयतेची बीजे आपल्याला यादवांच्या साहित्यातून सर्वत्र शोधता येतात. 'नेटिव्ह' म्हणजे देशी वृत्ती प्रामुख्याने मातीशी नाते सांगणारी आणि भूमीशी एकरूप होण्याची असते. स्थलांतरापेक्षा मुळाशी बांधून राहण्याची, भुई धरून राहण्याची वृत्ती त्यात असते. यादवांनी याच प्रवृत्तीचा, ग्रामीण कृषिसंस्कृतीचा ठळकपणे पुरस्कार केला. एवढ्यावरच ते थांबले नाहीत, तर या सगळ्या ग्रामीण अनुभूतीला कलात्मक रूपबंधात बांधण्यासाठी त्यांनी प्रयत्न केला. क्वचितप्रसंगी ते सौंदर्यवादाकडे झुकतानाही दिसले. 'स्पर्शकमळे'मधून वाचकांना हा अनुभव आला.

**आनंद यादवांच्या समग्र साहित्याचा आढावा घेताना कदाचित वेगवेगळी मतं व्यक्त होत राहतील. बरेवाईटपणाच्या चर्चाही होत राहतील, पण एक गोष्ट मात्र खरी; की त्यांच्या शेतीनिष्ठेविषयी शंका घेता येणार नाही. त्यांच्याच हिरवी संस्कृती या कथेतील भोईटे नावाचा प्राध्यापक म्हणतो- 'नुकसानीत आली तरी शेती टिकली पाहिजे... ती आहे म्हणून देश आहे. खेडी आहेत म्हणून शहरं आहेत, आपण आहोत, आपली संस्कृती आहे.'**

आनंद यादवांनी कथा, कविता, कादंबरी, ललित आणि समीक्षा असे सर्व साहित्यप्रकार हाताळले. खळाळ (१९६७), घरजावई (१९७४), माळावरची मैना (१९७६), आदिताल (१९८०), डवरणी (१९८२), उखडलेली झाडे (१९८६) हे कथासंग्रह; हिरवे जग (१९६०), मळ्याची माती (१९७८), मायलेकरं (१९८१) या दीर्घकविता, स्पर्शकमळे (१९७८) पाणभवरे (१९८२) हे ललित लेखसंग्रह; गोतावळा (१९७१), नटरंग (१९८०), एकलकोंडा (१९८०) माउली (१९८५) या कादंबऱ्या आणि समीक्षात्मक लेखन त्यांनी १९८५ पर्यंत केले.

१९८७ मध्ये त्यांची 'झोंबी' ही आत्मचरित्रात्मक कादंबरी आली. या कादंबरीला साहित्य अकादमीचा पुरस्कार प्राप्त झाला. नंतर 'नांगरणी' (१९९०), 'घरभिंती' (१९९२) आणि 'काचवेल' हे पुढचे भागही आले; पण 'झोंबी'ची उंची त्यांना पुढील कादंबऱ्यांमध्ये गाठता आली नाही. मुळात आत्मचरित्रात्मक लेखनाकडे वळल्याने त्यांच्या सृजनशीलतेला उतरती कळा लागल्याची चाहूलच त्यातून लागली. एका लेखकाच्या शेवटाची सुरुवात झाली होती. चरित्रात्मक कादंबरीचा प्रयोग म्हणून त्यांनी 'संतसूर्य' ही कादंबरी लिहिली. ती प्रकाशित झाल्यानंतर काही दिवसांनी ती वादाच्या भोवऱ्यात सापडली. कादंबरी मागे घ्यावी लागली. दरम्यान बऱ्याच गोष्टी घडल्या.

आनंद यादवांच्या लेखनातून, कवितेतून, व्यक्तित्वातून नेहमीच ज्या वारकरी संप्रदाय, वारकऱ्यांची जीवनशैली, अध्यात्म आणि शेतीनिष्ठा कायम दिसत राहिली, त्याच वारकरी संप्रदायाच्या भावनांनी यादवांच्या लेखकपणाला समाधिस्थ व्हावे लागले.

आनंद यादवांच्या 'नटरंग' या कादंबरीतील गुणाला ज्याप्रमाणे व्यवसायनिष्ठेपायी स्वतःच्या ऱ्हासाला सामोरे जावे लागले. त्याच्यातील कलावंताचा शोकात्म अंत होतो, तसाच शोकात्म अंत यादवांच्या लेखकपणाचाही झाला. मराठी साहित्यासाठी ही फार भूषणावह बाब नाही. हे शल्य संवेदनशील मराठी मनाला कायमच राहील. २००९ मध्ये साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष होऊनही ते अध्यक्षीय भाषण करू शकले नाहीत.

आनंद यादवांच्या समग्र साहित्याचा आढावा घेताना कदाचित वेगवेगळी मतं व्यक्त होत राहतील. बरेवाईटपणाच्या चर्चाही होत राहतील, पण एक गोष्ट मात्र खरी; की त्यांच्या शेतीनिष्ठेविषयी शंका घेता येणार नाही. त्यांच्याच हिरवी संस्कृती या कथेतील भोईटे नावाचा प्राध्यापक म्हणतो- 'नुकसानीत आली तरी शेती टिकली पाहिजे... ती आहे म्हणून देश आहे. खेडी आहेत म्हणून शहरं आहेत, आपण आहोत, आपली संस्कृती आहे.'

असा फकिरी विचार फक्त आणि फक्त शेतकरीच व्यक्त करू शकतो. हा अस्सल देशीवादी विचार त्यांची उंची वाढवण्यास पुरेसा होता. शेती, माती आणि शेतकरी यांना प्रतिष्ठा मिळण्यासाठी साहित्याचा हा प्रवाह वृद्धिंगत होणे, हीच त्यांना खरी श्रद्धांजली ठरेल. ◆

**प्रा. डॉ. भास्कर ढोके**
चलभाष : ९४२३०८१०४६



अनुक्रमणिका





लेख

प्रमोद मुनघाटे

# अभिजात वृत्ती आणि चिकित्सक समीक्षेचा आदर्श डॉ. अक्षयकुमार काळे

■

**ग्रेस यांच्या 'प्रतिभेच्या पाताळघरात' शिरून त्यांना बोलते करण्याचे कठीण काम सर्वप्रथम डॉ. काळे यांनी ३० वर्षांपूर्वीच केले होते. ग्रेस यांच्या एकूणच कवितेतील दुर्बोधता हा ग्रेस यांच्या कवितेपासून रसिक आणि समीक्षकांना दूर ठेवणारा अडसर होता ('ग्रेसविषयी' २००९). दुर्बोधता हे मर्ढेकर यांच्याही कवितेचे एक वैशिष्ट्य होते.**

■



डॉ. अक्षयकुमार काळे यांची ओळख मराठी साहित्याचे ज्येष्ठ अध्यापक-संशोधक व समीक्षक अशी असली, तरी सामान्य रसिक वाचकांना मात्र कवी ग्रेस, सुरेश भट, कुसुमाग्रज आणि नारायण सुर्वे ह्या मान्यवर कवींच्या अत्यंत दर्जेदार व दुर्मीळ मुलाखतींचा कर्ता म्हणून ते परिचित आहेत. अलीकडे त्यांच्या 'गालिबचे उर्दू काव्यविश्व' या पुस्तकाने ते अधिक प्रसिद्धीच्या झोतात आले. मर्ढेकर, कुसुमाग्रज व ग्रेस यांच्यावरील स्वतंत्र पुस्तके आणि 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन' हा बृहद्ग्रंथ अशा मोजक्या पण नेमक्या ग्रंथसंपदेमुळे काळे यांच्याविषयी मराठी साहित्य व समीक्षेच्या क्षेत्रात एक दबादबा निर्माण झाला आहे.

अक्षयकुमार काळे ह्यांच्या अभिरुचीचे, अभ्यासाचे आणि समीक्षेचे केंद्र फक्त कविता हेच राहिले आहे. 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन' ह्या प्रकल्पाकरिता नागपूर विद्यापीठाने त्यांना डी. लिट. ही सर्वोच्च पदवी बहाल केली आहे. डॉ. काळे स्वतःच म्हणतात, कविता हे माझे पहिले प्रेम आहे, श्रद्धा आहे आणि खरोखरच त्यांचा एकूण वाङ्मयीन प्रवास पहिला तर मराठी काव्याच्या आस्वादाने आणि चिकित्सक समीक्षेने त्यांचे अवघे व्यक्तिमत्त्व झपाटून गेले आहे. उर्दूतील गालिबच्या सर्व गझलांच्या अनुवादाने तर त्यांनी आता मराठीच्या पलीकडे झेप घेतली आहे.

वस्तुत: अक्षयकुमार काळे यांनी प्रारंभी काही कविताही केल्या होत्या; पण त्यांनी जेव्हा मराठीतील ज्ञानेश्वर-तुकारामापासून मर्ढेकर यांच्यापर्यंतचे कवी वाचले, तेव्हा त्यांना असे लक्षात आले की तो आपला प्रांत नव्हे. यातून डॉ. काळे यांची कवितेवरील अव्यभिचारी निष्ठाच लक्षात येते. मोरोपंत-रघुनाथ पंडित यांच्या पंडित काव्यापासून तर ग्रेस यांच्यापर्यंतच्या विशुद्ध भावकवितेचा त्यांच्यावर फार खोल प्रभाव असल्यामुळे त्यांची वाङ्मयीन वृत्तीच अभिजात घडवली गेली आहे, हे लक्षात येते. त्यांनी आपल्या निर्मितिक्षमतेचा कल ओळखला आणि ललितसाहित्यनिर्मितीकडून ते समीक्षेकडे वळले. त्यांच्यातील टीकाकाराच्या विदग्ध प्रतिभेने समीक्षेच्या आकाशात लीलया विहार केला. त्यांच्या मते कसलेला टीकाकार होण्यासाठी फसलेली ललितनिर्मिती होण्याची आवश्यकता नाही. आपल्या आस्वादक्षमतेशी सुसंगत असणाऱ्या वाङ्मयीन कलाकृतीचा निरामय आस्वाद घेण्याची, त्या कलाकृतीचा गुण जाणून घेण्याची आवश्यकता

आहे. चिंतनाचा पल्ला वाढला की कलाकृती आपल्याला अनेक विभ्रमांचा साक्षात्कार घडविते. समीक्षेचा मुख्य गाभा हा साक्षात्काराच्या सुसंगत मांडणीतच असतो.

अक्षयकुमार काळे यांचा समीक्षेविषयीचा स्वतंत्र दृष्टिकोन आहे; पण गांधीवादी किंवा मार्क्सवादी अशी जीवनदृष्टी त्यांना मान्य नाही. विशिष्ट जीवनदृष्टी स्वीकारलेल्या व्यक्तीमध्ये अवतीभवतीच्या जीवनाची व विश्वाची सगळी व्यवस्था लावता येते, हा दुराग्रह असतो असे त्यांना वाटते. वाङ्मयीन कलाकृती जीवनातूनच उमलते; तथापि श्रेष्ठ वाङ्मयीन कलाकृती स्वायत्त असते. ती कशानेही, कोणत्याही वादाने बद्ध नसते, असे ते म्हणतात. त्यांच्या समीक्षालेखनाच्या प्रेरणा मूलतः आस्वादात गुंतल्या आहेत. आपल्याला मिळालेला काव्यानंद आणि काव्याविषयी झालेले विशेष ज्ञान इतरांना सांगणे, हीच त्यांना आपल्या समीक्षेची प्रेरणा वाटते.

डॉ. निशिकांत मिरजकर यांना डॉ. काळे हे रूपवादी समीक्षक वाटतात. कवितेचा आकृतिबंध, रचना, भावप्रकटीकरण, आत्माविष्कार, तादात्म्य, आणि आत्मनिष्ठा या गोष्टी त्यांना महत्त्वाच्या वाटतात. काही समीक्षक फक्त कवितेच्या रूपावर लुब्ध होतात, तर काही तिच्या आशयद्रव्यातील नावीन्यावर आसक्त होतात. मात्र, आशय आणि रूपबंध यांवर एकत्रितपणे आपल्या समीक्षेचा प्रकाशझोत टाकणारे काव्यसमीक्षक फार मोजके असतात. अक्षयकुमार काळे हे अशा मोजक्या समीक्षकांपैकी एक आहेत, असा गौरव मिरजकर यांनी केला आहे. काळे यांच्या या समीक्षा संकल्पनेचा प्रत्यय त्यांच्या एकूणच समीक्षा व्यवहारातून कसा येतो आणि 'गोविंदाग्रज-समीक्षा' या ग्रंथात त्यांच्या भूमिकेला न पटणाऱ्या व प्रत्येक कवितेचा आशय क्रमाने मांडणाऱ्या ज्येष्ठ समीक्षकांना धारेवर धरले आहे, अशी नोंद मिरजकर यांनी केली आहे.

'कविता कुसुमाग्रजांची' (१९९७) या पुस्तकात डॉ. काळे यांनी स्वतःच्या समीक्षाविषयक भूमिकेचे आदर्श उपयोजन केले आहे. एका कवीची संपूर्ण समीक्षा कशी असते ह्याचा वस्तुपाठच त्यांनी समोर ठेवला आहे. कुसुमाग्रज हा त्यांच्या काव्याभिरुचीच्या निष्ठेचा विषय असला तरी ते समीक्षक म्हणून मात्र कुसुमाग्रजांच्या कवितेकडे तटस्थपणे पाहतात, हेही लक्षात घेतले पाहिजे. याचा दाखला म्हणून काळ्यांच्या 'जीवनलहरी-२' या संग्रहावरील टीकेचे उदाहरण प्रातिनिधिक आहे. काळे लिहितात, या संग्रहात एकही विलक्षण कलाकृती नाही. उमरखय्यामच्या काही रुबायामध्ये असणारे सामर्थ्यही या लहरींना लाभत नाही. याचे कारण त्या रुबायांमागे उमरखय्यामचे सगळे व्यक्तिमत्त्व आणि परिपक्व आध्यात्मिक चिंतन एकात्मपणे उभे आहे. या रुबाया म्हणजे केवळ मनावर उमटलेल्या लहरी नाहीत. '



अक्षयकुमार काळे यांनी एकेका कवीवर आणि एका कवीच्या एका कवितेवर विस्तृत समीक्षालेखन केले असले तरी त्यांचा कल प्रासंगिक स्फुट समीक्षेकडे राहिला नाही. दीर्घ मुदतीचे महत्त्वाकांक्षी प्रकल्प अत्यंत निष्ठेने राबविणे, हेच ध्येय त्यांनी कायम ठेवले आहे. कुसुमाग्रजांप्रमाणेच त्यांनी कवी ग्रेस, मर्ढेकर आणि गालिबवर विशेष लेखनप्रकल्प राबविले आहेत.

ग्रेस यांच्या कवितेबाबत फार थोडे अपवाद वगळता सगळ्या मोठ्या समीक्षकांनी मौनच पाळले होते. (ग्रेस गेल्यावर मात्र अनेकांनी आपली वाणी आणि लेखणी नको तितकी सैल सोडली.) ग्रेस यांच्या 'प्रतिभेच्या पाताळघरात' शिरून त्यांना बोलते करण्याचे कठीण काम सर्वप्रथम डॉ. काळे यांनी ३० वर्षांपूर्वीच केले होते. ग्रेस यांच्या एकूणच कवितेतील दुर्बोधता हा ग्रेस यांच्या कवितेपासून रसिक आणि समीक्षकांना दूर ठेवणारा अडसर होता ('ग्रेसविषयी' २००९). दुर्बोधता हे मर्ढेकर यांच्याही कवितेचे एक वैशिष्ट्य होते. त्यातील फरक स्पष्ट करताना काळे म्हणतात, 'मर्ढेकरांच्या काव्यातील दुर्बोधता पर्याप्त आहे. एका विशिष्ट मर्यादेपर्यंत दुर्बोध असणाऱ्या कवितेतील दुर्बोधतेचा छेद करून दडलेल्या किंवा दडवलेल्या अर्थाची प्राप्ती रसिकाला करून घेता येते. तोच काव्यानंद. दुर्बोधतेचे प्रमाण अति वाढले आणि त्यात चकवा शिरू लागला की विशिष्ट अर्थाच्या प्राप्तीतील रुची कमी होत जाते. काव्यात्म दुर्बोधता हे कवीचे सामर्थ्य असावे, दुर्बलता किंवा मजबुरी नसावी.



**१८८५ ते १९८५ या शंभर वर्षांतील मराठी कवितेची बहुसंदर्भी चिकित्सा 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन' या महाग्रंथात काळे यांनी केली आहे. एकोणिसाव्या शतकातील वासाहतिक इतिहास आणि गुंतागुंतीच्या सांस्कृतिक जीवनवास्तवामुळे मराठीतील कविता या प्रकाराला असंख्य परिमाणे प्राप्त झाली आहेत. धर्म, संप्रदाय, वैचारिक वाद आणि वर्ग-वर्ण अशा अभिनिवेशाच्या पलीकडे जाऊन मराठी कवितेला भिडणे किती कठीण आहे ते उपलब्ध काव्येतिहासावरून आपल्या लक्षात येते; पण काळे यांनी चिकित्सक अभ्यासक म्हणून स्वतःला या अभिनिवेशापासून अलिप्त ठेवले आहे.**

ग्रेसच्या कवितेत दुर्बोधतेचे प्रमाण वाढलेले दिसते. ग्रेसच्या कवितेतील एखाद्या कडव्याच्या पहिल्या दोन ओळी कळतात पण पुढच्या कळत नाही; पण जे कळले आहे, अनुभवले आहे, त्याची आनंदोर्मी खोटी नसते.'

'मर्ढेकरांची कविता : आकलन, आस्वाद आणि चिकित्सा' (२००६) हा अक्षयकुमार काळे यांचा आणखी एक प्रकल्पवजा समीक्षाग्रंथ. २००६ मध्ये प्रसिद्ध झालेल्या या ग्रंथापूर्वी मर्ढेकरांवर मराठीत भरपूर लिहिले गेले होते. तरीही वस्तुनिष्ठ संशोधक आणि सहृदय समीक्षक या नात्याने काळे यांनी मर्ढेकरांचे चरित्र, व्यक्तिमत्त्व, त्यांचे काव्य आणि काव्यशास्त्र यांना स्वतंत्र रीतीने विळखा घालण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. पण या पुस्तकाचे वैशिष्ट्य म्हणजे मर्ढेकरांच्या प्रत्येक कवितेचा अर्थ आणि आशय त्यांनी उलगडून दाखवलेला आहे. मर्ढेकरांची दुर्बोधता, भाषिक प्रयोग आणि आधुनिकता ह्यांचे विश्लेषण केवळ अभ्यासक, विद्यार्थी ह्यांनाच नव्हे तर सामान्य रसिकांना आकर्षित करून घेईल अशी रसज्ञता व संवेदनशीलता अक्षयकुमार काळे यांच्या या विवेचनात आहे. 'ह्या गंगेमधि गगन वितळले' यासारख्या कवितेचे आकलन पूर्वसुरींनी कसे चुकीचे केले आहे, हे सप्रमाण सिद्ध करण्याचे धारिष्ट्यही त्यांनी या ग्रंथात दाखवले आहे.

अक्षयकुमार काळे यांच्या मराठी साहित्याचे अध्यापन आणि समीक्षा या प्रदीर्घ प्रवासातील एक महत्त्वाचा टप्पा म्हणजे 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन'(१९९९). मराठीतील वाङ्मय इतिहास लेखनाच्या मर्यादांना बाजूला सारून काळे यांनी एखाद्या भाषेतील, एखाद्या कालखंडातील कवितेचा आलेख कसा मूल्यदर्शक व मौलिक होऊ शकतो ह्याचा आदर्शच मराठी समीक्षेत निर्माण केला आहे.

१८८५ ते १९८५ या शंभर वर्षांतील मराठी कवितेची बहुसंदर्भी चिकित्सा 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन' या महाग्रंथात काळे यांनी केली आहे. एकोणिसाव्या शतकातील वासाहतिक इतिहास आणि गुंतागुंतीच्या सांस्कृतिक जीवनवास्तवामुळे मराठीतील कविता या प्रकाराला असंख्य परिमाणे प्राप्त झाली आहेत. धर्म, संप्रदाय, वैचारिक वाद आणि वर्ग-वर्ण अशा अभिनिवेशाच्या पलीकडे जाऊन मराठी कवितेला भिडणे किती कठीण आहे ते उपलब्ध काव्येतिहासावरून आपल्या लक्षात येते; पण काळे यांनी चिकित्सक अभ्यासक म्हणून स्वतःला या अभिनिवेशापासून अलिप्त ठेवले आहे. प्रस्तावनेत ते म्हणतात, 'या काव्यदर्शनात अनेक बाजूंनी कवींचा अभ्यास करण्याचा मी प्रयत्न केलेला आहे. तो जसा एकेका कवीच्या संदर्भात केला तसाच त्या त्या कालखंडातील कवींच्या एकूण प्रवृत्तींच्या अनुरोधाने आणि समग्र काव्याच्या संदर्भात एकेका कवीच्या व्यक्तिनिष्ठ प्रेरणांचे व कार्याचे भान न विसरता एकत्रितपणे केला आहे. त्यातून त्या विशाल काव्यप्रवाहाने घेतलेली वळणे, कधी त्यांनी गाठलेली शिखरे व कधी त्यांची झालेली घसरण स्पष्ट करण्याचा माझा प्रयत्न आहे. त्यातून या शंभर वर्षाच्या कालखंडातील कवितेचे सलग मानचित्र उभे राहावे अशी अपेक्षा आहे.'

अक्षयकुमार काळे यांची स्वतःची अपेक्षा या ग्रंथाने पूर्ण केली आहे. संदर्भकालानुक्रमे आढावा, आस्वादक समीक्षा आणि वस्तुनिष्ठ मूल्यमापन असे स्वरूप असलेला यासारखा दुसरा ग्रंथ आज तरी उपलब्ध नाही. संदर्भसाधनांच्या अद्ययावत नोंदी हे तर या ग्रंथाचे मोठेच वैशिष्ट्य आहे. कालखंडाची सामाजिक-सांस्कृतिक पार्श्वभूमी, कवीचे व्यक्तिमत्त्व, त्याचा संप्रदाय, सामाजिक चळवळी आणि परस्परविरोधी प्रवाह अशी अनेक केंद्रे गृहीत धरून केलेली ही समीक्षा आहे. काळे यांचा हा एकच बृहद्ग्रंथ त्यांचे मराठी साहित्यातील योगदान अतुलनीय ठरविण्यास समर्थ आहे असे मला वाटते.

◆

**प्रमोद मुनघाटे**
सी-३०१, शेवाळकर गार्डन,
दक्षिण अंबाझरी मार्ग,
नागपूर -४४००२२
Pramodmunghate304@gmail.com



श्रद्धांजली

मंगला गोडबोले

# लेखनव्रती वि. ग. कानिटकर

ज्येष्ठ मराठी लेखक वि. ग. कानिटकर ह्यांचं मंगळवार ३० ऑगस्ट रोजी सकाळी वयाच्या नव्वदाव्या वर्षी निधन झालं. ते कालक्रमाला धरून होतं असं म्हणता येईल. गेली काही वर्षं त्यांना प्रकृतीची साथ नव्हती. तसंच २०१२ साली पत्नी सौ. निर्मलाबाई ह्यांचं निधन झाल्यापासून ते मनाने फार खचले होते आणि एकटेपणा, कृतिशून्यता, परावलंबन ह्यातून केवळ मृत्यूच आपली सुटका करू शकेल असं मानून ते वारंवार त्याचा धावा करत होते. एकेकाळी अप्रिय वाटलेल्या व्यक्तीचा, विचाराचा हिरिरीने, सात्त्विक संतापाने आणि पुरेशा अभ्यासातून खरपूस समाचार घेणारे वि. ग. असे हताश, निराश झालेले बघणं त्यांच्या जवळच्यांना क्लेशकारक होत होतं. अखेरीस ह्या सगळ्याला पूर्णविराम मिळाला.



विगंचा मित्रपरिवार मोठा होता. त्यात वेगवेगळ्या वेळी ह. अ. भावे, श्री. म. जोशी, श्री. ज. जोशी, यशवंतराव कानिटकर, द. धों. रत्नपारखी, पुंडलिक मोकाशी, श्रीभाऊ माजगावकर, गजानन क्षीरसागर, चित्रकार सहस्रबुद्धे, प्रि. सं. कुलकर्णी, नातू-साने-करंदीकर-लोकापूर-सु.रा.चुनेकर प्रभृती समवयस्क तर होतेच, पण पुढच्यांपैकी ह. मो. मराठे, चंद्रशेखर मराठे, निरंजन आगाशे, भानू काळे, मी स्वतः असे काही साहित्यप्रेमी त्यांना अधूनमधून भेटत होतो. मनात धुमसणाऱ्या काही विषयांबद्दल त्यांच्याशी बोलणं, त्यांची मतं जाणून घेणं आवडणाऱ्यांपैकी मी एक होते. ह्या नैमित्तिक भेटींमधून मला त्यांच्याविषयी जे समजलं, जाणवलं ते थोडक्यात लिहिते.




सर्वप्रथम नजरेत भरणारा होता तो त्यांचा राष्ट्रवाद. सावरकरांची भक्ती. 'जोसेफ मॅझिनी : आत्मचरित्र आणि राजकारण' ह्या आपल्या भाषांतरित ग्रंथाला सावरकरांनी सशस्त्र क्रांतीचे तत्त्वज्ञान सांगणारी ओजस्वी प्रस्तावना लिहिली. तिची बहुधा वि. गं. नी पारायणं केली असावीत. अनेकदा ते तिच्याविषयी बोलत. आयुष्याच्या अखेरीस सुधीर फडक्यांनी सावरकरांवर चित्रपट बनवावा, त्यामध्ये 'ने मजसी ने' ही कविता संपूर्णपणे म्हणावी, तिला कोणतीही कृत्रिम चाल-वाद्यमेळ वापरू नये ह्याचं त्यांना विलक्षण कौतुक होतं. अशा थोर राष्ट्रपुरुषाला उपेक्षेचे धनी करणाऱ्या किंवा प्रयत्नपूर्वक झाकोळणाऱ्या सत्ताधारी पक्षाबद्दलं साहजिकच राग होता. त्यांच्या हातची सत्ता काढून घेऊन जनमताने दुसऱ्या पक्षावर विश्वास टाकला तेव्हा वि. ग. मनोमन आनंदले होते. आणि 'इथून पुढं भलं होणार हाये बाबा' अशी अशा त्यांनी अनेकांपाशी व्यक्त केली होती.

■

**प्रखर राष्ट्रप्रेमी असणाऱ्या वि. गं.नी चरित्रं लिहिली ती मात्र बहुतेक साऱ्या परदेशस्थ नेत्यांची. हिटलर–माओ–लिंकन– चर्चिल ह्यांच्यासारखे आपापल्या काळातले महानायक त्यांनी निवडले. हे वरकरणी विरोधाभासाचं वाटेल. पण वि. गं. नी ह्या व्यक्तींची चरित्रं, त्यांच्या देशांचे इतिहास हे नेहमी भारताशी तुलना करूनच अभ्यासले. आपल्या देशालाही एखादा मॅझिनी, चर्चिल, लिंकन मिळायला हवा, अशा दृष्टिकोनातून त्यांचा पाठपुरावा केला.**

■



प्रखर राष्ट्रप्रेमी असणाऱ्या वि. गं.नी चरित्रं लिहिली ती मात्र बहुतेक साऱ्या परदेशस्थ नेत्यांची. हिटलर–माओ–लिंकन– चर्चिल ह्यांच्यासारखे आपापल्या काळातले महानायक त्यांनी निवडले. हे वरकरणी विरोधाभासाचं वाटेल. पण वि. गं. नी ह्या व्यक्तींची चरित्रं, त्यांच्या देशांचे इतिहास हे नेहमी भारताशी तुलना करूनच अभ्यासले. आपल्या देशालाही एखादा मॅझिनी, चर्चिल, लिंकन मिळायला हवा, अशा दृष्टिकोनातून त्यांचा पाठपुरावा केला. 'अब्राहम लिंकन : फाळणी टाळणारा महापुरुष' हे शीर्षकही ह्याचंच द्योतक आहे. देशाची अखंडता जपणारी, त्यासाठी झुंजणारी माणसं त्यांना नेहमीच मोठी वाटली. जगातल्या प्रत्येक महत्त्वाच्या घटनेचे पडसाद भारतात कसे उमटले, समांतर प्रसंगांमध्ये भारताने– इथल्या नेत्यांनी कोणती भूमिका घेतली, हा शोध त्यांना महत्त्वाचा वाटला. 'धर्म : महात्मा गांधींचा आणि स्वा. सावरकरांचा' ह्या त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण पुस्तकात तर त्यांनी विचारनिष्ठेची परमावधी गाठली. विशिष्ट वादग्रस्त विषयांवर ह्या दोघा धुरीणांची मतं कोणती होती हे त्यांच्याच शब्दांमध्ये समोरासमोर उद्धृत केलं. आधुनिक काळामध्ये परस्परविरोधी मताचे मानले जाणारे, रंगविले जाणारे हे नेते अंतर्यामी समांतर निष्ठांचे आहेत हे त्यांनी पुराव्यानिशी सादर केलं. एकापरीने गोलमाल विधानं करणाऱ्यांची त्यांनी कायमची बोलती बंद करून ठेवली. असा तौलनिक अभ्यास किती मेहनतीतून निपजतो हे तो करणाराच जाणू शकेल. मात्र, राष्ट्रवाद कितीही मोलाचा असला तरी शेवटी मानवतावादच जगाला तारेल, पुढे नेईल याबद्दल त्यांना शंका नव्हती. म्हणूनच राष्ट्रवादी हिटलरपेक्षा मानवतावादी चर्चिलवर ते जास्त भक्तीने लिहून गेले. परतंत्र–खंडलेल्या किंवा दुभंगू बघणाऱ्या देशासाठी राष्ट्रवाद मौलिक असला तरी अंतिम मानवी हित मानवतावादातूनच साधेल, हेच ते सांगत होते.

पुढे असं मौलिक, विचारगर्भ लेखन करणाऱ्या वि.गं.ची जवळजवळ ६ दशकांची साहित्यिक कारकीर्द सुरू झाली होती ती मात्र कथालेखनापासून. त्यांचं वाचन नेहमीच विपुल होतं. रविवार सकाळमध्ये, मुंबईच्या यशवंत मासिकामध्ये १९४६–४७ मध्येच त्यांच्या कथा प्रसिद्ध होत होत्या. ज्या वर्षी मौज दिवाळी अंकामध्ये दि. बा. मोकाशी ह्यांची 'देव चालले' कादंबरी प्रसिद्ध झाली त्याच वर्षी रहस्यरंजनाच्या दिवाळी अंकामध्ये वि.गं.ची कादंबरीही प्रसिद्ध झाली. स्वतःच्या सुमारे ३० कथा प्रसिद्ध झाल्यावर त्यांनी विमा पॉलिसीवर कर्ज काढून 'मनातले चांदणे' हा कथासंग्रह सिद्ध केला. त्याचं प्रकाशन मे १९५९ मध्ये मिरजेला भरलेल्या साहित्यसंमेलनात अध्यक्ष श्री. के. क्षीरसागर ह्यांच्या हस्ते झालं. त्याचं सर्वत्र चांगलं स्वागत झालं.

बी.ए. व बी.एस्सी. ह्या दोन पदव्यांचं शिक्षण, मोठ्या कुटुंबाची अंगावर पडलेली जबाबदारी, प्रेमलग्न, अकाउंटण्ट जनरलच्या कचेरीतली ३७ वर्षांची नोकरी, वेळोवेळी सोसावा लागलेला आर्थिक ताण, स्वतःच्या बंगल्याच्या स्वप्नाची पूर्ती व त्याचा वियोग अशा अनेक गोष्टींनी वि. गं.चं आयुष्य एका अर्थाने धकाधकीचं गेलं; पण सर्व टप्प्यांवर वाचन, लेखन, चिंतन ह्यांची सोबत त्यांनी जपली, जोपासली. गेल्या वर्षाच्या अखेरीपर्यंत ते नित्यनियमाने आणि गांभीर्याने वाचत होते, लिहीत होते. दोन्हींतही पुरेसं वैविध्य होतं. एकीकडे संगीत–क्रिकेट–गाजलेले हॉलिवुडपट ह्यांचं प्रेम, दुसरीकडे स्वतःच्या तात्कालिक अभ्यासाविषयीचं वाचन आणि आणखी एका धारेत मराठी साहित्य–संस्कृतीतल्या ताज्या घटितांचा मागोवा घेण्याची धडपड ह्यात ते सतत व्यग्र असत. पुस्तकं स्वतः खरेदी करून वाचत. ते ते पुस्तक खरेदी केलं ह्याची तारीख त्याच्या पहिल्या पानावर लिहून ठेवत, तसंच पुस्तकातल्या आवडलेल्या आणि खटकलेल्या मुद्द्यांवर



अनुक्रमणिका



**राष्ट्रवाद कितीही मोलाचा असला तरी शेवटी मानवतावादच जगाला तारेल, पुढे नेईल याबद्दल त्यांना शंका नव्हती; म्हणूनच राष्ट्रवादी हिटलरपेक्षा मानवतावादी चर्चिलवर ते जास्त भक्तीने लिहून गेले. परतंत्र-खंडलेल्या किंवा दुभंगू बघणाऱ्या देशासाठी राष्ट्रवाद मौलिक असला तरी अंतिम मानवी हित मानवतावादातूनच साधेल, हेच ते सांगत होते.**



तिथल्या तिथे काही बारीक टिप्पणी केलेली असते. पत्रव्यवहारही सुरू असे. कोणाही वाचकाने उत्सुकतेने काही संदर्भ, माहिती विचारली तर ती मिळवून सविस्तरपणे कळवण्याचे कष्ट ते घेत. त्यात कितीही वेळ, शक्ती गेली तरी तक्रार करत नसत. उलट, मागच्यांनी पुढच्यांना अशा प्रकारची मदत करणं हे ते आपलं कर्तव्य मानत. वि. ग. हे खऱ्या अर्थाने लेखनव्रती होते.

लेखनातलं वैविध्य टिकवल्यानेच त्यांना एवढी मोठी लेखकीय खेळी करता आली असेल असं जाणवतं. त्यांच्या मूळच्या कथाकार, कादंबरीकार ह्या प्रेरणेला थोडं वेगळं वळण लागलं ते तेव्हाच्या सुप्रसिद्ध 'माणूस' साप्ताहिकाच्या स्पर्शातून. १९६० साली पुण्याला बदली झाल्यानंतर मित्रवर्य दि. बा. मोकाशी ह्यांच्या सांगण्यावरून ते 'माणूस' परिवारात ओढले गेले. तेव्हाच्या तरुण आणि उसळत्या उत्साहाच्या वि.गं.ना 'माणूस'मध्ये मोकळं अंगणच मिळाल्यासारखं झालं. राजकारणाची आवड अंतरात होतीच. तिचा परिपोष झाला, तसंच लेखणीला मोकळं रान मिळालं. 'माणूस'मध्ये स्वतःच्या नावाने आणि नाना टोपणनावांनी वि.गं.नी विपुल लिहिलं. स्फूटं, सदरं, पत्रं, उपहासकथा इथपासून 'नाझी भस्मासुराचा उदयास्त' ह्या गाजलेल्या लेखमालेपर्यंत वि.गं.च्या लेखणीचे सर्व आविष्कार 'माणूस'मध्ये दिसले. रा.म.शास्त्री ह्या टोपणनावाने लिहिलेल्या ह्या लेखमालेचं पुस्तकरूप आज २९व्या आवृत्तीच्या रूपामध्येही तेवढंच लोकप्रिय आहे. माणूसच्या एरवीच्या गंभीर बाजामध्ये त्यांनी ग्यानबा ह्या टोपणनावाने 'मुक्ताफळे' हे विनोदी सदर लिहून धमाल उडवून दिली. 'सोबत' साप्ताहिकातही त्यांनी विपुल लिहिलं. ताज्या घटनांचा तिरका वेध घेण्याचं त्यांचं कसब ह्यातून वारंवार नोंदलं गेलं.

एकूणच १९वं शतक आणि २०व्या शतकाचा पूर्वार्ध ह्या राजकीय आणि सामाजिकदृष्ट्याही फार महत्त्वाचा कालखंड त्यांना वाटत असावा; कारण ह्या समकालीन काळाविषयी ते सतत वाचत राहिले, लिहीतही गेले. एरवी सामाजिक कथा लिहीत असताना त्यांनी 'पूर्वज', 'आणखी पूर्वज' ह्या अगदी वेगळ्या बाजाच्या कवितासंग्रहांचं योगदान दिलं. हा अपघात नाही. जुन्या पिढीतल्या नामवंतांचं व्यक्तिगत जीवन, त्यांच्या प्रेरणा-धारणा आणि त्यांनी झेललेले संघर्ष वि.गं.ना अभ्यासावेसे वाटले. मग ते राजवाडे असोत, सर्कसवाले छत्रे असोत किंवा ख्रिस्ती झालेला पहिला कोकणस्थ ब्राह्मण इसम नीळकंठशास्त्री असो. ह्या निळकंठशास्त्री ऊर्फ नेहेमिया गोरे ह्यांची पहिला धर्मांतरित माणूस म्हणून जी घुसमट झाली ती त्यांनी 'होरपळ' ह्या कादंबरीत अत्यंत परिणामकारकपणे रंगवली. विग हिंदुत्वाचे अभ्यासक, चाहते आणि पुरस्कर्ते असूनही ह्या कादंबरीत त्यांनी ख्रिश्चन धर्माची शक्तिस्थळं ज्या मार्मिकपणे दाखवली आहेत ते बघण्यासारखं किंवा वाचण्यासारखं आहे. वि. गं. नी वयाच्या चाळिशीच्या आत 'दर्शनज्ञानेश्वरी' लिहून ठेवावी, हेही इथे स्मरण्याजोगं आहे.

याखेरीज मनातले चांदणे, आसमंत, सुखाची लिपी, लाटा, जोगवा, कळावे-लोभ असावा हे कथासंग्रह; खोल धावे पाणी, शहरचे दिवे ह्या कादंबऱ्या; काही प्रवासवर्णन, फ्रँक वॉरेल-रोहन कन्हाय ह्यांची मुलांसाठी लिहिलेली चरित्रं, इत्यादी साहित्य वि.गंच्या नावावर जमा आहे. गुलशन नंदांच्या हिंदी कादंबरीपासून यू. आर. अनंतमूर्तींच्या 'संस्कार' ह्या कन्नड कादंबरीपर्यंत आवडलेल्या काही पुस्तकांचे त्यांनी अनुवाद केलेले आहेत. 'गाजलेल्या प्रस्तावना'सारखं संकलन आहे. वि.गं.चं सुमारे ४० पुस्तकांचं लेखन त्यांच्या व्यासंगाची साक्ष देणारं आहे.

वि.गं.मध्ये एक कर्तव्यदक्ष कुटुंबप्रमुख दडलेला होता. (काही वेळा तो प्रकटही होता.) घरसंसार, त्यातल्या प्राथमिक व्यवस्था, यंत्रणा, कुटुंबाचा आधारवड होणं, नातेसंबंध जपणं ह्या सर्वांबाबत ते स्वतः तर दक्ष होतेच पण



अनुक्रमणिका

इतरांनाही जागरूक करत होते. इतरांच्या घरांतली लग्नं जमवणं, आर्थिक संकटातून मार्ग दाखवणं (प्रसंगी स्वतः मदत करणं), दीर्घ आजारपणात संबंधितांना साह्य करणं ह्यामध्ये ते अनेकदा पुढाकार घेत. ह्या बाबतीत कमी पडणाऱ्यांचा राग राग करत. आपण कमी पडू नये म्हणून कमालीचे शिस्तबद्ध जगत. सर्व गोष्टी जागच्या जागी ठेवणं, सर्व देवघेवीची नोंद ठेवणं, सर्व कौटुंबिक कार्यक्रमांना आपण जातीने हजर राहणं, प्रत्येक नातेवाइकाची यथायोग्य दखल घेणं नेहमी सुरू असे. वेळ नाही, वय झालं, खर्चिक आहे, अशा सबबी ते सांगत नसत. प्रत्येक कुटुंबामध्ये त्या त्या कुळ-वंश-घराण्याचा इतिहास सांगणारी एक चोपडी किंवा एक कुलवृत्तान्त असावा आणि प्रत्येक पिढीने तो अद्ययावत करत जावा, स्वतःपर्यंत तपशील आणून ठेवावेत, असा त्यांचा आग्रह होता. ह्याने कुळाचा+समाजाचाही इतिहास नोंदला जातो. ह्या भूमिकेमुळे त्यांनी कानिटकर घराण्याचा त्यांच्या खापरपणजोबांपासून त्यांच्या स्वतःपर्यंतचा वृत्तान्त 'स्वाक्षरी' ह्या नावाने लिहून काढला. तो रविराज प्रकाशनाने प्रसिद्ध केला. अशा ग्रंथाला व्यापारी मूल्य नसणार हे त्यांना नक्कीच माहीत होतं, पण केवळ कर्तव्यभावनेने त्यांनी ते कष्ट घेतले, आणि पुढे आपल्या मुलाने, नातवाने ह्यात यथायोग्य भर घालावी, अशी इच्छाही व्यक्त केली.

साहित्यक्षेत्रातही त्यांनी अशीच कुटुंबप्रमुखाची किंवा अनुभवी ज्येष्ठाची भूमिका घेतली होती. साधारणपणे १९४५-५० पासूनचा मराठी साहित्यविश्वाचा तोंडवळा त्यांना परिचित होता. विपुल वाचन, प्रवास, जनतासंपर्क आणि एकूण साक्षेप असल्याने त्या बाबतीत त्यांच्यापुढे थापाबिपा मारणं कोणालाही जमत नसे. उलट, गुणी पण दुर्लक्षित लेखकाला पुढे आणणं, त्याला प्रकाशक मिळवून देणं, प्रकाशकाकडून चोख व्यवहार होईल हे बघणं, कोणाची फसवणूक होण्याची शक्यता दाखवून देणं, अनभ्यस्त लेखनाला झोडणं, पोकळ दंभ मिरवणाऱ्याला त्याची जागा दाखवणं ह्या गोष्टी ते वेळोवेळी करत. जरूर तिथे पुराव्याने सिद्ध करायलाही मागेपुढे पाहत नसत. त्यामुळे त्यांचा वचक वाटलेले पुष्कळ लोक मी पाहिले आहेत. उलट, ज्याला वाचनाची आवड आहे त्याला योग्य ती वाचनसामग्री सुचवणं, मिळवून देणं ह्याचीही त्यांना हौस होती. इंग्रजी क्लासिक्स न वाचलेल्या (माझ्यासारख्या) अनेक लेखकांना ते समज देत आणि कूपमंडूक वृत्तीने 'मराठी एके मराठी'त रमू नका, असा सल्ला देत. एकूणच, 'अभ्यासोनि प्रकटावे' यावर त्यांचा विश्वास होता आणि तो न करणाऱ्यासाठी दयामाया नव्हती. हे करत असताना स्वतःची शेखी मिरवण्यापेक्षा मराठी साहित्यजगत संपन्न व्हावं ही इच्छा जास्त प्रबळ होती. कुटुंबप्रमुख तरी दुसरं काय मागतो?

मराठी साहित्याच्या ऱ्हासाबद्दल म्हणजे सुमारे २००० सालानंतरच्या साहित्यविश्वाबद्दल ते उद्वेगाने बोलत. त्यांची एक धारणा पक्की होती. लेखक ५-७-१० पानं लिहितो तेव्हा त्याच्याजवळ सांगण्यासारखं काही तरी असलं पाहिजे. पानंच्या पानं भरवणाऱ्या लेखकाचं काहीच म्हणणं नसावं, ही हॅज नथिंग टु से, हे त्यांना कधी रुचलं नाही. त्याला कशाबद्दलच काहीच म्हणायचं नसेल तर त्याने लिहिलं का, असं ते तळमळून विचारत.

आता वाटतं, की वि. ग. सगळ्याच गोष्टी अत्यंत तळमळीने, मनःपूर्वक करत असत. उगाच जाता जाता काही तरी केलं किंवा लिहिलं असं कधी होत नसे. ही इन्टेन्सिटी, ही आर्तता कमी होऊ लागलेल्या गेल्या एक-दोन दशकांशी जुळवून घेणं त्यांना म्हणूनच जड गेलं असणार.

व्यक्तिशः मला गेली सुमारे ३ दशकं वि.गं.चा स्नेह लाभला. दर महिना-दीड महिन्याने माझी पावले त्यांच्या घराकडे वळत. वि.गं.च्या ऐसपैस गप्पा मला ऐकायला मिळत, क्वचित खोचक टीकाटिप्पणीलाही सामोरं जावं लागे; पण दर भेटीत काही ना काही वैचारिक खाद्य मला मिळाल्याशिवाय राहत नसे. माझ्या लेखकीय खटाटोपात कुठे अडल्यासारखं, हरल्यासारखं वाटलं तर त्यांचा वडिलकीचा सल्ला मला हवासा वाटे. त्यांच्या एक शतांशही व्यासंग मी करू शकले नाही; तरीही त्यांच्याकडून घेता येण्याजोगं थोडंफार मी घेतलेलं आहे. ते जवळपास माझ्या वडिलांच्या वयाचे. माझ्या वडिलांना फार आयुष्य न लाभल्याने माझ्या लेखनकामाठिमध्ये त्यांचा सक्रिय सहभाग फारसा नव्हता, ह्याचं दुःख मला अनेकदा वाटलेलं आहे. वि.ग. गेल्यावर दुसऱ्यांदा असंच पोरकेपण घेरून गेलं हे मात्र खरं.

◆

**मंगला गोडबोले**
७,गीताली
पी.वाय.सी., पुणे ४
दूरभाष : २५६७५५३४
चलभाष : ९८२२४९८२२८



अनुक्रमणिका



श्रद्धांजली

प्रा. आबासाहेब सरवदे

# आदिवासींच्या प्रश्नांसाठी रस्त्यावर उतरणारी लेखिका
# महाश्वेतादेवी

**महाश्वेतादेवींच्या लेखनाच्या प्रेरणा ह्या त्यांच्या व्यक्तिगत आयुष्यातून आकाराला आल्या नाहीत, तर त्या समाजाच्या सेवा करत करत आलेल्या अनुभवातून त्या लेखनास प्रवृत्त झाल्या आहेत, हे लक्षात घेतले पाहिजे. गोरगरिबांची, तळागाळातल्या लोकांची सेवा करणे हे त्यांनी कर्तव्य मानले. ह्या कर्तव्यात त्यांनी कधी कसूर केली नाही, दुर्लक्ष केले नाही. अशा महाश्वेतादेवींची १७५ पेक्षा अधिक पुस्तके प्रकाशित आहेत. महाश्वेतादेवींच्या 'हाजार चुराशीर माँ' (१९९७), 'प्रत्येक चोपन्न मिनिटागणिक' (१९९२), 'अरण्येर अधिकार' (१९७७) ह्या कादंबऱ्या मराठी भाषेत अनुवादित झाल्या आहेत.**

आदिवासींचे, सामान्यांचे व भूमिहीनांचे प्रश्न, समस्या साहित्यातून प्रभावी शब्दांत मांडणारे अनेक लेखक होऊन गेले आणि आहेतही; पण सामान्यांच्या प्रश्नांसाठी, न्याय्य, हक्कांसाठी रस्त्यावर उतरून लढा देणारे आणि तो लढा शब्दबद्ध करणारे लेखक-लेखिका समाजामध्ये फार दुर्मिळ असतात. अशा दुर्मिळांमध्ये समाविष्ट होणारी लेखिका म्हणजे महाश्वेतादेवी- जिने आदिवासींचे प्रश्न केवळ साहित्यातून नव्हे तर रस्त्यावर उतरून मांडले, त्या महाश्वेतादेवींचे नुकतेच निधन झाले. अशा कार्यकर्ती लेखिकेच्या साहित्यावर व जीवनावर प्रकाश टाकणारा हा लेख आहे.

बंगाली लेखिका महाश्वेतादेवी यांचा जन्म १४ जानेवारी १९२६ रोजी 'ढाका' येथे (आता बांगला देश) झाला. त्यांचे कुटुंब उच्चभ्रू आणि उच्चशिक्षित होते. त्यांचे वडील मनीष घटक प्रसिद्ध बंगाली लेखक, तर भाऊ ऋत्विक घटक प्रसिद्ध चित्रपट दिग्दर्शक होते. महाश्वेतादेवींनी १९४६ मध्ये 'शांतिनिकेतन'मधून इंग्रजी विषयातील पदवी घेतली. त्यानंतर त्यांनी एम. ए. केले. पुढे इंग्रजीच्या प्राध्यापिका म्हणून बिजायग्रह जोतिराय कॉलेजमध्ये त्यांनी नोकरी केली. नोकरी करीत करीत समाजसेवा आणि आदिवासींच्या कल्याणकारी कार्यक्रमांचे त्यांनी आयोजन केले. पुढे त्यांनी पत्रकारिता केली. 'युगांतर' आणि 'वर्तिका' ह्या मासिकांतून स्तंभलेखन केले. अशा उच्चशिक्षित, सुसंस्कृत आणि उत्कृष्ट पत्रकार असलेल्या महाश्वेतादेवींनी बंगालमधील बिजोन भट्टाचार्य ह्या कसदार नाट्य अभिनेत्याशी विवाह केला.

१९५०-६० च्या दशकात महाश्वेतादेवींनी साहित्य-लेखनाला सुरुवात केली. कथा, गूढकथा, लोककथा, लघुकथा, नाटक आणि कादंबरी ह्या साहित्यप्रकारांत त्यांनी विपुल लेखन केले. 'नटी' (१९५७) ही त्यांची पहिली कादंबरी. 'हाजार चुराशीर माँ', (१९७४), 'अरण्येश्वर अधिकार' (१९७७), 'झाँसी की रानी', 'रुदाली', 'नीलछबी' आणि 'प्रत्येक चोपन्न मिनिटागणिक' ह्या त्यांच्या गाजलेल्या कादंबऱ्या आहेत. त्यांच्या काही साहित्यकृतींचा इंग्रजी, मराठी, फ्रेंच, जपानी व इटालियन भाषेत अनुवाद झाला





अनुक्रमणिका

आहे. त्यांच्या एका कथेवर चित्रा पालेकर यांनी २००६ मध्ये 'मातीमाय' नावाचा चित्रपट प्रदर्शित केला, तर 'हाजार चुराशीर माँ' ह्या कादंबरीवर 'हाजार चुराशीर माँ' नावाचा हिंदी चित्रपट गोविंद निहलानी यांनी १९९८ मध्ये प्रदर्शित केला.

तळागाळातला आदिवासी माणूस हा त्यांच्या लेखनाचा केंद्रबिंदू आहे. आदिवासींचे प्रश्न, समस्या, त्यांचे शोषितपण, वंचितपण रेखाटताना महाश्वेतादेवी फार आक्रमक आणि परखड होतात. 'हाजार चुराशीर माँ' ह्या कादंबरीच्या प्रस्तावनेत त्या म्हणतात, 'आज स्वातंत्र्य मिळाल्यानंतर इतकी वर्षे उलटली तरी आपल्याकडे गरिबी आहे. लोक भुकेले आहेत, भूमिहीन आहेत, कर्जबाजारी आहेत. आपली संपूर्ण सामाजिक व्यवस्थाच बदलायला हवी. तिच्याविरुद्धच्या नुसत्या रागाने काही हे बदलणार नाही... म्हणूनच मी लिहिते. मला शक्य असेल तसं, तेवढं. मला मग अपराधीपणाची भावना राहत नाही, स्वतःची लाज वाटत नाही' (जुवेकर, २०००, ०३). यावरून असे लक्षात येते, की सामाजिक व्यवस्था बदलण्यासाठी लेखिकेने घेतलेली भूमिका स्पष्ट, अधिक समर्थ, अधिक परखड आणि परिणामकारक होती. आदिवासी समाजाबद्दल त्यांच्या मनात प्रचंड तळमळ होती. त्यापोटी त्यांनी पश्चिम बंगालमधील 'मेदिनीपूर' व 'पुरुलिया' ह्या भागातील 'लोधा' व 'खेडिया' ह्या आदिवासी जमातींच्या लोकांसाठी शिक्षणविषयक व आरोग्यविषयक शिबिरे घेतली. साहित्य अकादमीच्या एका कार्यक्रमात महाश्वेतादेवी आणि लक्ष्मण गायकवाड यांची भेट झाल्यावर त्या म्हणाल्या होत्या, 'लक्ष्मणा, मी तुझ्या 'उचल्या' पुस्तकातील काही भाग इंग्रजीतून वाचला आहे. तेव्हापासून माझ्या मनात होतं, की हा आदिवासी, माझा मुलगा मला केव्हा भेटणार?... आज योग आला'( गोखले, २००९, १२). ह्या संवादातून त्यांचा प्रेमळ, ममताळू व खेळकर स्वभाव प्रतीत होतो. आदिवासी माणूस अजून विकासाच्या प्रक्रियेतच नाही. तो विकासाच्या प्रक्रियेत यावा, त्याला शिक्षण मिळावे, नोकरी मिळावी, मान-सन्मान मिळावा, वेगवेगळे नागरी पुरस्कार मिळावेत अशी त्यांची मनोमन इच्छा होती. त्या म्हणायच्या, 'ज्या दिवशी या देशात एखाद्या आदिवासी लेखकाला ज्ञानपीठ पुरस्कार मिळेल तेव्हा मला खरा आनंद वाटेल' (गोखले, २००९, ११). महाश्वेतादेवींच्या ह्या विधानातून त्यांच्या जीवनातील आनंदाच्या जागा किती निराळ्या, निकोप, निर्भेळ, निरागस आणि आरशासारख्या स्वच्छ होत्या याची जाणीव होती. महाश्वेतादेवी आदिवासींच्या प्रश्नांसाठी रस्त्यावर उतरून लढे देत. घाबरत नसत. आदिवासींच्या विकासासाठी त्या मोठ्या जोमाने, हिरिरीने काम करत.

आदिवासींच्या जीवनातील विविध प्रश्नांचा शोध घेणाऱ्या महाश्वेतादेवींना १९७० मध्ये साहित्य अकादमी, १९८६ मध्ये पद्मश्री, १९९६ मध्ये ज्ञानपीठ पुरस्कार, तर १९९७ मध्ये मॅगसेसे पुरस्कार प्राप्त झाला. आयुष्याच्या उत्तरार्धातही व्याधींना न जुमानता त्या लिहीत असत. निरनिराळ्या सामाजिक विकासाच्या कार्यक्रमांत त्या स्वतःला गुंतवून घेत. त्यांची काम करण्याची ही ऊर्मी आणि ऊर्जा लोकांना अचंबित करणारी होती. अशी ही आदिवासींची माय वयाच्या ९० व्या वर्षी (२८ जुलै २०१६) आपल्यातून निघून गेली.

**महाश्वेतादेवींच्या साहित्यलेखनाचे विशेष**

महाश्वेतादेवींच्या लेखनाच्या प्रेरणा ह्या त्यांच्या व्यक्तिगत आयुष्यातून आकाराला आल्या नाहीत, तर त्या समाजाच्या सेवा करत करत आलेल्या अनुभवातून त्या लेखनास प्रवृत्त झाल्या आहेत, हे लक्षात घेतले पाहिजे. गोरगरिबांची, तळागाळातल्या लोकांची सेवा करणे हे त्यांनी कर्तव्य मानले. ह्या कर्तव्यात त्यांनी कधी कसूर केली नाही, दुर्लक्ष केले नाही. अशा महाश्वेतादेवींची १७५ पेक्षा अधिक पुस्तके प्रकाशित आहेत. महाश्वेतादेवींच्या 'हाजार चुराशीर माँ' (१९९७), 'प्रत्येक चोपन्न मिनिटागणिक' (१९९२), 'अरण्येर अधिकार' (१९७७) ह्या कादंबऱ्या मराठी भाषेत अनुवादित झाल्या आहेत.

**सामान्य माणसांविषयी तळमळ**

सामान्य माणसांविषयीची तळमळ ही महाश्वेतादेवींच्या लेखनाची खरी प्रेरणा आहे, याचा प्रत्यय त्यांच्या 'अरण्येर अधिकार' आणि 'हाजार चुराशीर माँ' ह्या अनुवादित कादंबरीतून येतो. उत्तर प्रदेश, बिहार, ओडिशा, बंगाल ह्या राज्यांतील गोरगरिबांची, दलितांची, आदिवासींची सामाजिक व आर्थिक स्थिती नाजूक आहे. चहाच्या मळ्यात काम करणाऱ्या मजुरांवर आजही जमीनदारांकडूनच नाना तऱ्हेने अन्याय, अत्याचार होतो. हातावर पोट असणाऱ्या दलितांना, आदिवासींना

स्वातंत्र्यानंतरही न्याय मिळत नाही, तेव्हा महाश्वेतादेवींसारख्या संवेदनशील लेखिकेला खूप खंत वाटते, खेदही वाटतो. अशा गोरगरीब मुलांना शिक्षण मिळावे, नोकरी मिळावी, त्यांना समाजात सन्मानाने जगता यावे, त्यांच्या सर्वांगीण विकासासाठी प्रयत्न व्हावेत म्हणून गोरगरिबांचे, दलितांचे, अनुसूचित जाती-जमातींचे, आदिवासींचे प्रश्न त्या कधी लेखनातून मांडत, तर कधी प्रत्यक्ष रस्त्यावर उतरून त्यांचे प्रतिनिधित्व करत.

सर्वसामान्य माणसाला त्याच्या जीवनात न्याय मिळावा, ही त्यांची भूमिका त्यांच्या लेखनातून स्पष्ट होते. 'हाजार चुराशीर माँ' या कादंबरीच्या प्रस्तावनेत महाश्वेतादेवी म्हणतात, 'आयुष्य हे काही गणित नाही. माणूस राजकारण खेळण्यासाठी जन्माला आलेला नाही. माणसाचे जगणे आणि न्याय हे सर्वांत महत्त्वाचे' (जुवेकर, २०००, ०३). सामान्य माणसाचे जगणे दुःखमय, असह्य करण्यामध्ये सत्ताधारी लोक आघाडीवर असतात. अशा सत्ताधाऱ्यांना आपल्या लेखनातून आदिवासींच्या प्रश्नांची, दारिद्र्याची जाणीव त्या करून देतात. 'हाजार चुराशीर माँ'मधील नक्षली बनलेल्या समूच्या घरावर गोळीबार होतो तेव्हा समूचे घर पूर्ण उद्ध्वस्त होते. त्या वेळी समूची आई म्हणते, 'व्हय ताई, इथं गरिबाचं दुकान व्हतं. पैका कुठं व्हता जवळ? चार वया, पेन्सिली, पाट्याचं दुकान व्हतं. ह्ये घर किती कस्टानं उभं केलं!' (हाजार चुराशीर माँ- ३७) समूच्या आईच्या ह्या केविलवाण्या विधानातून आदिवासींचे दारिद्र्य, त्यांची हतबलता अधोरेखित होते. माणसाचे जगणे जसे महत्त्वाचे तसेच ते सुसह्य असणेदेखील अधिक महत्त्वाचे असते. ते होण्यासाठीच महाश्वेतादेवी लेखनातून आदिवासींचे, सामान्यांचे प्रश्न हाताळत होत्या.

**स्त्रीजीवनाचा वेध**

महाश्वेतादेवींनी बंगाल, बिहार, ओडिशा आणि उत्तर प्रदेश ह्या प्रदेशांतील ग्रामीण, आदिवासी आणि शहरी भागातील स्त्रीजीवनाचा वेध आपल्या साहित्यातून घेतला. त्यांच्या 'हाजार चुराशीर माँ', 'प्रत्येक चोपन्न मिनिटागणिक', 'रुदाली', आणि 'अरण्येर अधिकार' ह्या कादंबऱ्यांतून प्रेमळ, परोपकारी, शोषित, बंडखोर, व्यसनाधीन, चारित्र्याने कलंकित, दारिद्र्याने गांजलेली, नोकरी-व्यवसाय करणारी, मजुरी करणारी अशी अनेकरूपी स्त्री पाहायला मिळते. ह्या स्त्रीचा प्रेमळपणा अंतर्मुख करणारा. तिचा परोपकार आत्मसात करायला लावणारा, तिचा शोषितपणा विचारप्रवृत्त करणारा, तिची बंडखोरी नवा इतिहास रचणारी, तिची व्यसनाधीनता चिंताग्रस्त करणारी, तिचे दारिद्र्य मन पिळवटून टाकणारे, तिचा नोकरी-व्यवसाय समतेचे मूल्य सांगणारा आणि तिची मजुरी शासनकर्त्याला जाग आणणारी अशी आहे. स्त्रीची ही विविधांगी रूपे महाश्वेतादेवींच्या साहित्यात पाहावयास मिळतात.

**शासनव्यवस्थेतील हुकूमशाहीचे दर्शन**

स्वातंत्र्योत्तर कालखंडात शासनव्यवस्थेने लोकशाहीचे धिंडवडे काढल्याचे चित्र महाश्वेतादेवींच्या 'हाजार चुराशीर माँ'मधून प्रत्ययास येते. 'हाजार चुराशीर माँ' ह्या शीर्षकाचा अर्थ '१०८४ बिल्ला क्रमांक असलेल्या कैद्याची आई' असा आहे. स्वातंत्र्योत्तर काळातही आदिवासी पाड्यावर, वस्त्यांवर अजून पक्के रस्ते, पाणी, वीज, दवाखाने, बसस्थानके आणि संडास (शौचालये) यांची कसलीही व्यवस्था नाही. म्हणूनच लालटू, पारथ, समू, विजित, नंदिनी आणि व्रती हे आदिवासी विद्यार्थी शासनविरोधात एक नक्षली चळवळ उभी करतात. प्रस्थापितांची सत्ता उलथवून टाकण्यासाठी आदिवासी तरुण सरकारविरोधात घोषणा देतात, रातोरात भिंतीवर घोषणा लिहितात, तेव्हा अशा तरुणांना पोलिस पकडून तुरुंगात डांबतात, त्यांना गुन्हेगार ठरवितात. त्यांच्या गुह्य भागाला वेदना देतात, त्यांच्या डोळ्यांसमोर हजार वॅटचा बल्ब धरतात. शिवाय, त्यांच्यावर हल्ला झाल्यानंतर त्यांची प्रेते त्यांच्या आई-वडिलांना देत नाहीत. अशी हुकूमशाही प्रवृत्ती शासनव्यवस्थेत पाहायला मिळते. त्याबद्दल लेखिका म्हणते, 'त्यांची हत्या कोणीही करू शकतं. सर्व पक्षांच्या आणि मतांच्या लोकांना या तरुणांची हत्या करण्याचा अनिर्बंध आणि लोकशाही अधिकार आहे. त्यासाठी कायद्याची मान्यता, निर्णय काहीही लागत नाही. त्यांची कशीही हत्या करा. एकट्याची किंवा सबंध गटाची. गोळी, सुरा, कोयता, भाला, जांबिया... कोणत्याही शस्त्राने, कोणत्याही वेळी, शहराच्या कोणत्याही भागात, एकाच्या किंवा अनेकांच्या साक्षीने त्यांची हत्या कशीही केली तरी चालते' (हाजार चुराशीर माँ, २१). बंगालच्या प्रांतात माणसाने नक्षली बनणे हा मोठा गुन्हा ठरतो; त्यामुळेच नक्षली झालेल्या तरुणांच्या भावनेचा, इच्छेचा,



**महाश्वेतादेवींचे लेखन हे काल्पनिक स्वरूपाचे नसून ते अनुभवजन्य स्वरूपाचे व वास्तववादी आहे. त्यामुळे त्यांना 'वास्तवाची भाष्यकार' म्हटले तर ते वावगे ठरणार नाही. महाश्वेतादेवी स्वतः पत्रकार, वार्ताहर व सामाजिक कार्यकर्त्या असल्यामुळे त्या वेगवेगळ्या प्रदेशांत प्रत्यक्षात जाऊन लोकांचे प्रश्न, समस्या, अडचणी जाणून घेत. त्यामुळे समाजात राहणारी, समाजाशी हितगुज करणारी, त्यांच्याबरोबर रस्त्यावर उतरणारी, अशी त्यांची ओळख तयार झाली होती.**

मागण्यांचा विचारच व्यवस्थेकडून होत नाही. परंतु व्यवस्थेला कोण दोष देणार? व्यवस्थेच्या विरोधात कोणीही उठो, त्याचा मृत्यू ठरलेला, असे चित्र स्वातंत्र्योत्तर कालखंडात पाहायला मिळते.

बंगालमध्ये नक्षलवादी बनलेल्या तरुणांच्या मागण्यांकडे व्यवस्था मानवतावादी दृष्टिकोनातून पाहत नाही, म्हणून तर हजारोंच्यावर तरुणांचे प्राण जात (व्रती १०८४ वा बळी, हाजार चुराशीर माँ). दिसला नक्षली की डांब तुरुंगात, या भूमिकेने नक्षली आणि व्यवस्था यांच्यातील संघर्ष अधिकच वाढत गेला. व्यवस्थेने तुरुंगाची उंची वाढवली- पण शोषितांच्या, नक्षलवाद्यांच्या प्रश्नांची सोडवणूक कधी केली नाही; परंतु कधी तरी ती होईल, ह्या आशावादी भूमिकेतून महाश्वेतादेवी त्यांची व्यथा 'हाजार चुराशीर माँ'मधून अतिशय ठळकपणे मांडताना दिसतात.

### जंगलवासीयांची व्यथा

महाश्वेतादेवींनी जंगलवासीयांची व्यथाही आपल्या साहित्यातून अधोरेखित केली. त्यांची 'अरण्येर अधिकार' (१९७७) ही कादंबरी जंगलवासीयांच्या जीवनावर आधारित आहे. ब्रिटिश राजवटीत मुंडा आदिवासींचे झालेले सामाजिक, आर्थिक शोषण हे कादंबरीचे मध्यसूत्र आहे. 'अरण्य' ही मुंडा जमातीची माता. कोल, संथाल, ओराव व मुंडा या आदिवासी जमाती शतकानुशतके जंगलात राहत. हे आदिवासी लोक जंगलातच शिकार करीत, गुरे चारीत, लागवडीसाठी जमीन तयार करीत आणि पालापाचोळा, लाकूडफाटाही गोळा करीत. मात्र, हा अरण्यावरचा अधिकार विदेशी सरकारला मान्य नव्हता. म्हणून त्यांनी १८७८ मध्ये एक जंगल कायदा केला आणि त्याची प्रत्यक्ष कारवाईही सुरू केली. त्यामुळे जंगलवासीयांचे अन्न, वस्त्र, निवारा आणि व्यवसाय यासारखे प्रश्न निर्माण झाले. अरण्यावर अधिकार सांगणाऱ्या आदिवासी जामातींना हुसकावून लावण्यासाठी ब्रिटिश अधिकारी त्यांच्यावर खटले भरत. कारण त्यांना कायदा समजत नाही, कोर्ट-कचेऱ्यांची भाषा समजत नाही. वकील काय बोलतो, जज्ज काय बोलतो ते समजत नाही आणि शेवटी न्यायही मिळत नाही. अनेक वर्षे न्याय न मिळताच हे आदिवासी तुरुंगात खितपत पडतात आणि मरूनही जातात. बिरसा मुंडाचे तेच झाले. बिरसा मुंडा जंगलवासीयांच्या शोषणाविरुद्ध लढला; पण त्यालाही तुरुंगात डांबले आणि तोही तिथेच वारला. २६१ पानांच्या ह्या कादंबरीत मुंडा आदिवासी जमातीचे सरकारने केलेले शोषण, अन्याय, अत्याचार हे मन सुन्न करून टाकणारे आहेत. जंगलवासीयांच्या व्यथा, वेदना समाजासमोर याव्यात, ह्या भूमिकेतून महाश्वेतादेवींनी नेहमीच लेखन केले.

### अनुभवजन्य लेखन

महाश्वेतादेवींचे लेखन हे काल्पनिक स्वरूपाचे नसून ते अनुभवजन्य स्वरूपाचे व वास्तववादी आहे. त्यामुळे त्यांना 'वास्तवाची भाष्यकार' म्हटले तर ते वावगे ठरणार नाही. महाश्वेतादेवी स्वतः पत्रकार, वार्ताहर व सामाजिक कार्यकर्त्या असल्यामुळे त्या वेगवेगळ्या प्रदेशांत प्रत्यक्षात जाऊन लोकांचे प्रश्न, समस्या, अडचणी जाणून घेत. त्यामुळे समाजात राहणारी, समाजाशी हितगुज करणारी, त्यांच्याबरोबर रस्त्यावर उतरणारी, अशी त्यांची ओळख तयार झाली होती. महाश्वेतादेवींचा लोकांशी थेट संबंध येत असल्यामुळे त्या लोकांचे प्रश्नच त्यांच्या कादंबरीचे विषय होत. त्यांनी मांडलेला जीवनानुभव हा वास्तववादी असल्यामुळे तो वाचकांच्या मनाची पकड घेतो. आजपर्यंत साहित्यापासून दूर राहिलेल्या व्यक्ती आणि त्यांचे प्रश्न महाश्वेतादेवींनी आपल्या साहित्यातून आग्रहाने मांडले.

त्यामुळे त्यांचे सारे लेखन अनुभवगम्य आणि विचारांना चालना देणारे आहे. महाश्वेतादेवींच्या अनुभवजन्य लेखनामुळे त्यांच्या लेखणीला जिवंतपणा, विश्वसनीयता व मौलिकता प्राप्त होते. शिवाय एक सामाजिक दस्तऐवज म्हणूनही त्यांच्या लेखनाकडे पाहता येते.

महाश्वेतादेवींनी बंगाल, बिहार, ओडिशा ह्या भागांतील आदिवासी, दलित जाती-जमातींमध्ये व वस्त्यांमध्ये जाऊन त्यांचे प्रश्न समजून घेतले. ते सोडविण्यासाठी त्यांनी स्वतःच्या परीने उत्तरे शोधण्याचा प्रयत्नही केला. 'पुरुलिया'- सारख्या भागात त्यांनी शिक्षण व हस्तकला केंद्रे सुरू केली. त्यामुळे त्यांचे लेखन हे अनुभवसिद्ध आणि विश्वासार्हता प्राप्त करणारे आहे हे स्पष्ट होते. महाश्वेतादेवींच्या लेखनाचा आधार घेऊन विद्यमान शासनव्यवस्थेला आदिवासींच्या, शोषितांच्या विकासासाठी निश्चित प्रयत्न करता येतील असे त्यांचे लेखन आहे. आदिवासींच्या प्रश्नांसाठी अविरत लढा देणाऱ्या या मायमाउलीला भावपूर्ण आदरांजली!

**संदर्भसूची**

१. कोठावळे अशोक (संपा) - (२००९) 'ललित' (मासिक- वर्ष ४७ वे, अंक ८ वा) (गोखले मंगला- महाश्वेतादेवी)
२. महाश्वेतादेवी - (२०००) 'हाजार चुराशीर माँ' (अनु- जुवेकर अरुणा)
३. महाश्वेतादेवी - (१९९२) 'प्रत्येक चोपन्न मिनिटागणिक' (अनु- जोशी पद्माकर)
४. महाश्वेतादेवी - (१९७७) 'अरण्येर अधिकार' (अनु- श्रीनिवास प्रभा)
५. खांडगे, गुंडी, देवधर, मिरजकर (संपा) (२००६) 'भारतीय भाषांतील स्त्रीसाहित्याचा मागोवा' (खंड- १)

◆

**प्रा. आवासाहेब उत्तम सरवदे,**
मराठी विभाग.
वीर वाजेकर महाविद्यालय, फुंडे, ता. उरण,
जि. रायगड (नवी मुंबई) ४००७०२
मोबाइल : ९९८७२९१४५१

(नुकताच शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर येथे 'भारतीय लेखिकांचे अनुवादित कादंबरी लेखन' या विषयावर (जून २०१६) प्रबंध सादर केला आहे. सदर प्रबंधामध्ये 'महाश्वेतादेवींच्या कादंबरी लेखनाचा अभ्यास मांडलेला आहे.)

---





अनुक्रमणिका



परीक्षण

डॉ. किशोर सानप

# काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान

माणुसकीचे हिरवेगार पीक जगाच्या भूमीत काढण्यासाठी कवी हाडामांसात अन् रक्तात आयुष्यभर पोसलेले चांगुलपणाचे बी कवितेतून पेरत जातो. माणुसकीवर नितांत श्रद्धा बाळगणारा हा कवीही ज्ञानेश्वरांप्रमाणेच जगातला भूक-तृष्णातृप्तीचा मळा फुलविण्यासाठी विठूजवळ काळ्याईच्या कुशीत सृजन आणि समृद्धीचा मळा फुलविण्यासाठी पसायदान मागतो. कारण त्याला जगाच्या भूमीवर माणुसकीची उत्तम बियाणांची कसदार शेती करायची आहे. या कसदार, उत्तम शेतीतच, माणुसकीच्या हिरव्यागार मोक्षमेळ्यात माणुसकीची हिरवीकंच पहाट उगवेल, हे कुणब्याने आयुष्यभर पाहिलेले हिरवे स्वप्नही तो रंगवत जातो.



ग्रामीण भागातून पुढे आलेल्या नव्या पिढीच्या कवींनी आपल्या गावगाड्याशी आणि तिथल्या कृषी जनजीवनाशी घट्ट नाळ जोडूनच काव्यसृजनाच्या क्षेत्रात पदार्पण केले. उमेदीच्या काळात आपल्या अस्वस्थ वर्तमानावर पर्याय म्हणून शहरात नोकरीनिमित्त स्थिरावल्यावर; गावगाड्यात जगलेल्या मातीचे ऋण मान्य करीतच, संवेदनशील अभिव्यक्तीचा हुकमी एक्का म्हणून, गतजीवनाच्या स्मृतीतून स्व-शोधाची तीव्रकोमल जाणीव व्यक्त करीतच, अस्वस्थ वर्तमान आणि कृषिजीवनाचे मृत्युपंथी वास्तव उलगडून दाखविण्यासाठी काव्यलेखनाचा मार्ग स्वीकारला.

'काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान' या संग्रहातील कवी गणेश शिवाजी मरकडची कविताही याच अस्वस्थ वर्तमानाच्या काळात आपल्या काळ्या मातीत राबणाऱ्या सर्वहारा माणसांच्या जीवनजाणिवा आणि 'काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान' समर्थपणे व्यक्त करताना दिसते. समकालीन सामाजिक वास्तव आणि कृषिजीवनातील, गावगाड्यातील बदल सूक्ष्मपणे टिपून बळीराजाच्या जीवनातील दुःखवेणा आणि उमाळ्यांना संवेदनशील गणेशने कवितेतून उजागर केले आहे. कुणब्याचं गाणं, गावाला सोबत घेऊन जाताना, काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान, ह्या सर्वच कवितासंग्रहांमधून कवीची परिपक्व जीवनदृष्टी आणि आत्मभान प्रकट झाल्याचे दिसते.

'काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान' या संग्रहातूनही गावगाड्यात जगणाऱ्या माणसांच्या भंगणाऱ्या मनांचे आणि कमालीचे अस्वस्थ करणारे आत्मभान सत्त्व आणि शैलीसह व्यक्त झालेले आहे. गणेशची कविता शब्दकळा, प्रतिमासृष्टी, लयबद्धता, आशयघनता स्वतंत्र शैलीची परिमाणे निर्माण करणारी आहे. ओवी, अभंग, अष्टाक्षरी आदी छंदांसह मुक्तछंदातही गणेशची कविता रसिकांच्या मनात ठाव घेताना दिसते. ती गावगाड्यातल्या सत्त्वाची आणि तत्त्वाची भाषा बोलते. बोलीभाषिक रूपांची लयदार निर्मिती दुःखानुभूतीला अधिकाधिक गडद करीत जाते.

अरुण जाखड्यांनी पद्मगंधा प्रकाशनातर्फे संग्रह प्रकाशित करताना अत्यंत देखण्या आणि दर्जेदार रूपात काव्यसंग्रहाची निर्मिती केली आहे. रविमुकुल यांचे आशयघन मुखपृष्ठ, अत्यंत देखणे मुद्रणकौशल्य कवितेच्या आंतरिक सौंदर्याची अनुभूती अधिक गडद करताना दिसते. या संग्रहात सात भागांत (काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान, जगण्याच्या असोशीचं कोवळं रोप, ऊन सरत नाही तेव्हा, हे शहर चालून येते माझ्यावर, काळीजफुलांची कविता, पाऊस : काही ओले संदर्भ, मूठभर उजेड चोरून) एकूण १०१ कवितांची मांडणी केलेली आहे.



अनुक्रमणिका

कवितेचे हे सर्वच खंड कवीच्या निर्मितिप्रक्रियेचा तळ ढवळून कळवळ्याचे पापुद्रे मांडणारे आहेत.

काळ्या मातीच्या जीवनजाणिवांचा कळवळा, कसणाऱ्या कुणबाऊ जीवनातील दुःखांचे उमाळे, ग्लोबल अस्वस्थ वर्तमानाची आच समाजाला जाणवली पाहिजे; शेतकऱ्यांप्रति अस्मानी-सुलतानी संकटांवर मात करण्याचे नवे युग अवतरले पाहिजे, असा उदंड आशावाद समाजाच्या मनात निर्माण करण्याचे सामर्थ्य गणेशच्या याही संग्रहातल्या कवितांना लाभलेले आहे. 'तुका म्हणे अणु तुजविण नाही। नभाहूनि पाहे वाढ आहे।।' काळ्या मातीच्या अस्वस्थ वर्तमानाची धग अणूतून नभापेक्षाही विस्तारत जाताना पाहून कवी अंतर्बाह्य हादरतो. तो समाजालाही हादरे देत राहतो. 'विठू तुझा नामघोष अभंगात आळवितो, कुणब्याचा उद्घोष कवितेत जागवितो.' कुणब्याच्या जिनगाणीची दुःखे आळविण्याचे शस्त्र कवीला सापडले आहे.

### काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान

आशेचा सूर्य कितीदा उगवावा? कितीदा रानातल्या पिकांना 'मूठमाती' द्यावी? कितीदा सुखाच्या हंगामांची राखरांगोळी व्हावी? काळजावर धोंडा ठेवून डोळ्यांतलं पाणी आटलं. 'पाचवीला पुजी अटळ दुष्काळ, सदा तारांबळ सुगीला...तो तुटत होता, जसे तुटत होते मुळापासून केळीचे घड, मटकन खाली बसून हातानं डोळं घट्ट दाबून, तो पाहत होता शून्यात, कारण सारंच शून्य झालं होतं...दुष्काळ अविरत जिवंतपणी जाळणाऱ्या चिंतेसारखा, दुष्काळ नांगरून पडलेल्या शेतांच्या प्रेतांच्या प्रतीक्षेतले स्मशान...रापलेला बाप खंगलेली माय, मोकलुनि धाय जिनगाणी...लागलाय फुटू काळ्याईला पान्हा, उपाशीच तान्हा कुणबीक...' हेच कुणब्यांचे अनादी काळापासूनचे दुखणे दूर तर झालेच नाही. उलट, अधिकाधिक कुणब्यांच्या उपाशी पोटाच्या कळवळ्यापोटी पान्हा फुटला.

'दुष्काळ-दुःस्वप्न येऊच नये, पडूच नये हिरव्यागार मनात, हिरव्यागार जगात...' कवीला असं कवितेत लिहिता येतं. 'त्याच्या मनासारखं सारं सारं घडू दे, त्याची स्वप्नं सत्यात उतरू दे, अठ्ठावीस युगांच्या विठ्ठला, तुझ्या लाडक्या भक्ताच्या आयुष्यात, नवा सूर्योदय होऊ दे, अन् उजळू दे त्याचं भाग्य लख्ख लख्ख... सोन्यासारखं...' अशी आशादायक कविताही सर्वच काळ्याईशी इमान राखणाऱ्या कवींनी लिहिता येते. परंतु कवीचे मायबाप कविता जगतात. कविता भोगतातही. कुणब्याच्या कविमुलांना मात्र मायबापाच्या काहूर डोळ्यांनी विपरीत जिनगाणीची कविता वाचताही आली नाही आणि लिहिताही आली नाही. कविता लिहिणे सोपे असते. विठ्ठलाची युगेयुगे वारी करून कवितेची पंढरी कवितेच्या प्रांतात दुमदुमत आली आहे आजवर. परंतु कुणबी होऊन मृत्युमयी दुःख भोगणे सोपे नसते. कुणब्याच्या मरणप्राय वेदना सहन करणे केवळ कुणब्यालाच जमते, कवीला नाही... 'काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान गिळू पाहतेय २१ व्या शतकाच्या प्राक्तनाला...शक्यतांच्या पर्वताची धारदार टोकं उचलून धरतील, अभावग्रस्तांच्या आशयसूत्रांनी...सूर्यही आता बोथट होतोय मातीत रुतलेल्या संवेदना पोसून, आणि आपण किती पालख्यांना खांद्यावर वाहणार आहोत अंधाराची बिकट वाट...तसं आता जगणंही वाळू घातलंच आहे, आता फक्त निमूट प्रतीक्षा उन्हाची शतकानुशतके...' कवीची प्रातिनिधिक तीव्रकोमल संवेदनशील आत्मजाणीव त्याच्या पारदर्शक प्रामाणिक अभिव्यक्तीचे मौलिकपण व्यक्त करते.

### जगण्याच्या असोशीचं कोवळं रोप

'ऋतू पांघरावा नवा, नवे पांघरावे भास, झाले क्षितिज उदास, तरी जगण्याची आस...' जगण्याची चिवट आस, हाच शेतकऱ्यांचा जीवनाच्या पडझडीतही शाबूत असलेला कणा असतो. 'बाप भुकेचा कोंडा, बाप दगडाचा धोंडा, बाप कणखर तरी, मनी लोण्याचा गोळा...माणूस काळाखप्प पडलाय, अस्थिपंजर झालाय, मरणासन्न झालाय...पण तरीही जगण्याच्या असोशीचं कोवळं रोप रुजून येताना दिसतंय माणसातून...' हा माणूस कोण? नाग, घोणस, फुरसे अन् मण्यार यांचे जालीम विष भिनत चाललेली माणसे की काळ्या मातीचे अस्वस्थ जीवघेणे वर्तमान जगणारी शेतीमातीत राबणारी गावगाड्यातली माणसे?... 'क्षणाचे जगणे आता तुटता तुटत नाही, मरणाच्या दारातही मृत्यू गवसत नाही...पण जगणं इतकं मऊ असतं का? चिखलगोळ्यासारखं...तिच्या आयुष्यात अंधारापलीकडे काही असेल काय?... अव्यक्तातून व्यक्त होतो आभाळभर आभाळून येतो, घट्ट रुतून बसलेल्या दुःखाचे सुख भोगतो...आता वाटतंय, स्वतःला घ्यावं कोंडून एखाद्या निर्वात पोकळीत, अन् व्हावं रितं रितं...कारण, जन्मदाता पिता तोच होई रिता, अभावांचा त्राता सांगू कुणा?' हे अव्यक्ताचे दुःख व्यक्त करताना निर्वात पोकळीत कोंडून घेण्याची भावना कवीला होणे म्हणजे त्याच्याही जगण्याच्या असोशीचे कोवळे रोपटे आपसूकच कवितेत विस्तारत-फुलत जाते.

**हे शहर चालून येते माझ्यावर...**

गावगाड्यातून कवी शहरी येतो तेव्हा गगनचुंबी इमारती, धूर ओकणारे कारखाने, कर्णकर्कश वाहनांचे ध्वनिप्रदूषित आवाज, कोंदट हवा, घाण पाणी, गोंगाट, घड्याळाच्या काट्यांवर धावणाऱ्या मानवी जीवनाच्या यंत्रगाड्या, दैनंदिन जीवनाला कोंडून टाकणारा अजस्र जबडा, या सर्वच जीवघेण्या चढावांवरून पुन्हा आपल्या गावगाड्याच्या हिरव्यागार, शुद्ध, निर्मळ जीवनात परतावेसे कवीला वाटते. परंतु, 'अन् हे शहर माझा पाठलाग करतंय गावापर्यंत, अन् गावातही, हे शहर चालून येते माझ्यावर...' हे खेड्याशहराचं संमिश्र वास्तव जग आता कुणालाही गावाच्या निर्मळ, तरल, शुद्ध जीवनाकडे जाऊ देत नाही. कारण आता शहरेच ग्लोबल खेड्यात विसर्जित झाली आहेत. 'या शहरी खेड्यात प्रश्न उगवतच राहतात हरळीसारखे, संबंधाच्या काळ्याभोर जमिनीत, कितीदा उपटून टाकले तरी प्रश्न सुटत नाहीत, हरळी संपत नाही...' हरळी ही ऐन पेरणीनंतरच्या उगवतीच्याच काळात शेतात जलदगतीने वाढत जाणारी चिवट, लागट, चिरंजीव वनस्पती असते. कितीही वेळा उपटून काढली तरी जमिनीच्या पोटातून पुन्हा पुन्हा जोमदारपणे उगवत जाते. शेतकऱ्यांच्या काळजात चिंतांची ओझीही हरळीसारखी वाढवतच नेते. आता हीच लागट हरळी, जी शेतजमीन निःसत्त्व करीतच शेतकऱ्यांचा गळा आवळते, तीच हरळी आता ग्लोबल खेड्यात जगणाऱ्यांचे चिवट आणि लागट वास्तव म्हणून गावगाड्यातून शहरांचेही गळे आवळताना दिसत आहे.

'इथं मनं धुऊन मिळतील' या कवितेत कवीने तमाम मानवी मनांना आवाहन केले आहे. 'इथं मनं धुऊन मिळतील, दगड होत असलेल्या मनात माणुसकी भरून मिळेल...बोथट झालेल्या संवेदनशीलतेला लावली जाईल धार...आत्मा, हृदय, मन सर्व काही रीसायकल करून मिळेल...नीरस जगणं केलं जाईल समृद्ध...फक्त तुम्हाला कवितेच्या विश्वात व्यतीत करावं लागेल तुमचं रिकामं आयुष्य काही काळ'...खरंच, कवितेत नीरस जगणे समृद्ध करण्याची कुवत असते? दगड होत असलेल्या मनात माणुसकीचा झरा फोडता येतो कवितेला? काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान बदलवून काळ्याईची कूस समृद्धीने भरता येते? कुणब्यांच्या जीवनात हरळीसारखे अणूतून नभाचे



▸ **काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान**
▸ **गणेश शिवाजी मरकड**
▸ **पद्मगंधा प्रकाशन, पुणे**

व्यापक रूपात वाढणारे जीवघेणे-आत्महत्येचा गळफास आवळत नेणारे भयावह वास्तव अभावातून समृद्धीकडे वळवता येईल?- असे अनेक प्रश्नही कवीच्या मनात उपस्थित होताना दिसतात.

**काळीजफुलांची कविता**

युगे अठ्ठावीस विठूचीही वीट कधी काळ्याईच्या दुःखाने थरथरली नाही- द्रवलीही नाही. कवितेला जर काळ्याईच्या डोळ्यांतले अश्रू पुसता आले तर किती भाग्यवान म्हणावे कवितेला आणि कवींनाही! कारण, 'हाताची घडी तोंडावर बोट' अशी अवस्था प्राप्त झालेल्या समाजात 'हाताची घडी तोंडावर बोट, असं गुरुजी म्हणायचे लहानपणी...आजही आम्ही घडी घातलीय हाताची, आपण करतच नाही काही नवनिर्माण, काही सृजनात्मक काम...' कवींसह सबंध व्यवस्थेनेच शेतकऱ्यांच्या जिनगाणीचे वाभाडे काढायला आरंभ केल्यावर मग कवींनीही हाताची घडी, तोंडावर बोट ठेवून कवितेच्या काळीजफुलांचे सृजनमळे फुलविले नाहीत तर या जगात एक विषण्ण अशी निर्वात, जगण्याची शुष्क पोकळीच जन्माला येईल की काय, असे कवीला वाटत असावे.

कवींनी काळीजफुलांची कविता जगाच्या सृजनशील भूमीत पेरली पाहिजे, 'जेणेकरून कविता पसरत राहते गंध होऊन वाऱ्याबरोबर...कविता व्यापून टाकते अवघे आयुष्य काळाबरोबर...कविवर्य, तुम्ही खरंच लिहीत नसता काहीही, तुमचा वर्तमान, भूत आणि भविष्यकाळही, तुमची कविता तुमची नसतेच कधी, तुम्ही असता निमित्तमात्र...लिहितं तुमच्या नसानसांत भिनलेलं गाव, लिहितात रक्तात पोसलेली माणसं, आणि श्वासात पेरलेला निसर्ग...' अशी काळीजफुलांची सृजनलळा लावणारी कविता तरी किती कवींच्या कवितेतून निमित्तमात्र निर्माण झालेली असते? कवीचे अस्तित्वच गिळंकृत करणारी ही निरलस, शुद्ध सृजनशीलता कवीच्या असण्याचेच एकमेव परिमाण असते. मराठीतच नव्हे, तर जगातल्या अनेक भाषांतल्या कवींना अजूनही आपल्यातला कवी वजा करून कविता लिहिता आल्याचे दिसत नाही. ज्या दिवशी कवीशिवाय कविता जगाचे जीवन समृद्ध करील तो कवितेसाठी सोनियाचा दिवस असेल.

'काय बोलायचं असतं कवीला?... कवीला भिडता



अनुक्रमणिका

येत नाही कुठल्याही दुःखाशी समर्थपणे, कवीला होता येत नाही समरस कुठल्याहीं वेदनेच्या कार्यकारणभावाशी, कवीला पोचता येत नाही समग्रपणे कुठल्याही निरपेक्ष सत्यापर्यंत...तरीही कवी जगत राहतो असहाय आणि अस्वस्थ आशयाच्या समुद्रातील अभिव्यक्तीच्या काठावर तटस्थ...आता कवितेशिवाय जगणं कवीला करील हद्दपार, मनातल्या तगमगीसह अन् क्षणभंगुर स्वप्नांसह... गमावण्यासारखे तसे कवीकडे तरी काय असते कवितेशिवाय?..' कवी निरपेक्ष सत्यापर्यंत पोहोचत नाहीत; परंतु सत्यासाठी माझी शब्दविवंचना कवींच्या सृजनाचा भाव बनत नाही. अशा कवींजवळ गमावण्यासारखं तरी काय असतं कवितेशिवाय? कवीने हेच आजच्या कवी-काव्य जगाचे सत्य साक्षात कवितेतूनच उजागर केलेले आहे.

**मूठभर उजेड चोरून...**

कवीचे तर असो. मातीला जात, धर्म, वर्ण नसतो. मातीला माणुसकी असते. मातीमाय आणि मायमाती असते. 'देहाचा पाऊस सुखाचा सोहळा, भक्तीचाच मळा पांडुरंगी...' तरी पण पाऊस जितका सृजनशील असतो तितकाच तो सृजनाचे अंकुर खुडत सृजनाच्या बागा भुईसपाट करून 'पाणी मळ्यात, पाणी तळ्यात, पाणी डोळ्यांत' आणतो. किड्यामुंग्यांच्या गर्दीत, शहरी कोलाहलात माणसाच्या आतला आवाजच ऐकू येत नाही. म्हणूनच कवी म्हणतो, 'शब्द पेरा हो शेतात आणि घाला खतपाणी, उद्या येईल रुजून काळ्याईत अभंगवाणी...तुकोबाने फुलविले भक्तीचे शेतमळे, शेतामध्ये अभंगाचा शब्दगंध दरवळे...' याच उन्नत कवितारूपात कवी गणेशचीही कविता वाहत जाते. 'तहानभुकेनं व्याकूळ कोणी उपाशी आहे, अन्नपाणी मागत फिरत आहे, लज्जा झाकण्यापुरतंही वस्त्र नाही अंगावर, माणुसकीच उघडी-नागडी आहे, घराशिवाय-निवाऱ्याशिवाय एखादा माणूस राहतो आहे, ऊन-वारा-थंडी-पाऊस सहन करतो आहे, आरोग्य- शिक्षण अन् हाताला काम नाही, बेरोजगार म्हणून कोणी वणवण फिरतो आहे, धर्म-वंश-जात-पात-वर्ग- लिंगानुसार भेदभाव होत आहे, पुष्कळ असणाऱ्यांकडून अभावग्रस्तांवर अन्याय होत आहे, शेतकरी-मजूर व कामगारांची पिळवणूक होत आहे, अपंग-वृद्ध व निराधारांची आबाळ होत आहे, खून-दरोडे-अनाचार-स्त्रियांवर अत्याचार-छळ- फसवणूक-बलात्कार-जाळपोळ-दंगली-बॉम्बस्फोट- दहशतवादी-अतिरेक्यांचा धुमाकूळ अन् सामान्यांचं जीवन भयभीत, कुठेच न्याय मिळत नाही, कुणीच वाली राहिला नाही, जगणं असह्य झालं आहे, माणूसपण शिकवलं जात नाही, संस्कार घडवले जात नाहीत, जगणं समृद्ध होत नाही... असं तर व्हायलाच नको...' हे सारं कुणीच लिहिणार नाही, कवितेतून व्यक्त होणार नाही, असेही व्हायलाच नको म्हणून कवीची कविता हे सर्व कवितेतूनच व्यक्त करीत जाते.

तात्पर्य, कवी कवितेचे प्रयोजन कवितेतूनच मांडताना म्हणतो, 'मोक्ष कुणी पाहिलाय, पण जगण्याच्या अंतिम क्षणी तृप्तीची फुलपाखरं डोळ्यांत बागडताना दिसतील...माझ्यावर विश्वास ठेवा अगर ठेवू नका, माझा विश्वास आहे माणसाच्या अस्तित्वावर, माणसातल्या माणुसकीवर...मी पाहतोय वाट उगवेल माणुसकीची पहाट...' माणुसकीचे हिरवेगार पीक जगाच्या भूमीत काढण्यासाठी कवी हाडामांसात अन् रक्तात आयुष्यभर पोसलेले चांगुलपणाचे बी कवितेतून पेरत जातो. माणुसकीवर नितांत श्रद्धा बाळगणारा हा कवीही ज्ञानेश्वरांप्रमाणेच जगातला भूक-तृष्णातृप्तीचा मळा फुलविण्यासाठी विठूजवळ काळ्याईच्या कुशीत सृजन आणि समृद्धीचा मळा फुलविण्यासाठी पसायदान मागतो. कारण त्याला जगाच्या भूमीवर माणुसकीची उत्तम बियाणांची कसदार शेती करायची आहे. या कसदार, उत्तम शेतीतच, माणुसकीच्या हिरव्यागार मोक्षमेळ्यात माणुसकीची हिरवीकंच पहाट उगवेल, हे कुणब्याने आयुष्यभर पाहिलेले हिरवे स्वप्नही तो रंगवत जातो.

कवी गणेशची कविता आशावादाचे उदंड बियाणे कवितेच्या सृजनशील भूमीत पेरत जाते. ही माणुसकीची मोक्षदायक पेरणी जशी कवीला फलनिष्पत्तीपर्यंत नेण्याची वाट सुकर करते, तशीच ती काळ्याईत राब राब राबून हाडाची काडे करूनही सुगीची आणि सुखाची वाट पाहणाऱ्या कुणब्यांच्याही जीवनातील दुःखाचा अंधार नष्ट होण्यास उपकारक ठरावी, हीच थोर भावना कवी गणेशच्या 'काळ्या मातीचे अस्वस्थ वर्तमान' या संग्रहातील कवितांच्या केंद्रवर्ती असून, तिचाच परीघ कवितांच्या रचनेतून करुणपणे विस्तारत जाताना दिसतो. कवी गणेशची कविता फलद्रूप होवो आणि माणुसकीची हिरवी पहाट जगाच्या मरुभूमीवर उगवो, हीच शुभकामना!

◆

डॉ. किशोर सानप
कमला नेहरू शाळेजवळ,
रामनगर, वर्धा ४४२००१
मोबाइल : ९३२६८८०५२३, ९४२२८९४२०५
email-dr.kishorsanap@gmail.com.
web-www.kishorsanap.com



अनुक्रमणिका










परीक्षण

डॉ. शैलेंद्र लेंडे

# यशवंत मनोहर यांचा 'युगांतर' जाणिवांचा कवितासंग्रह

**यशवंत मनोहर यांची 'युगांतर'मधील कविता प्रगल्भ आशयाची कविता आहे. कवीने आपल्या आयुष्यभर जोपासलेली विचारदृष्टी व मूल्यदृष्टी या कवितासंग्रहामधून मौलिक स्वरूपात आविष्कृत झालेली आहे. खरे तर त्यांचे यापूर्वीचे कवितासंग्रह महत्त्वपूर्ण होतेच, पण त्यांचा हा कवितासंग्रह त्यांच्या यापूर्वीच्या सर्व कवितासंग्रहांचे सामर्थ्य घेऊन आलेला कवितासंग्रह असल्याचे दिसून येते. आज यशवंत मनोहर आयुष्याच्या परिपक्व, प्रगल्भ व परिणतप्रज्ञ वळणावर उभे आहेत.**

डॉ. यशवंत मनोहर हे नाव मराठी साहित्याच्या क्षेत्रातील एक अतिशय महत्त्वपूर्ण असे नाव होय. मागील चार-पाच दशकांपासून ते निष्ठापूर्वक वाङ्मयनिर्मिती करीत आहेत. कविता, कादंबरी, प्रवासवर्णन, पत्रलेखन, ललित गद्य, वैचारिक साहित्य, समीक्षा इत्यादी विविध साहित्यप्रकार त्यांनी गंभीरतापूर्वक हाताळले आहेत आणि त्यांच्यावर स्वतःची वैशिष्ट्यपूर्ण अशी नाममुद्रा उमटविली आहे. समकालीन महाराष्ट्रात एक आघाडीचे आंबेडकरवादी विचारवंत व प्रागतिक विचारदृष्टीचे साहित्यिक या नात्याने ते सर्वपरिचित आहेत. असे असले, तरी मनोहरांचा पिंड हा मुळात कवीचा पिंड आहे आणि कवी हीच त्यांची पहिली व ठसठशीत ओळख आहे. 'उत्थानगुंफा' या कवितासंग्रहाच्या रूपातून त्यांनी चार दशकांपूर्वी मराठी साहित्यविश्वात पहिल्यांदा प्रवेश केला होता आणि तेव्हापासून आजतागायत त्यांची कविता विविध दिशांनी व विविध वळणांनी समृद्ध होत गेली आहे.

'उत्थानगुंफा'नंतर मनोहर यांचे 'काव्यभीमायन', 'मूर्तिभंजन', 'जीवनायन', 'प्रतीक्षायन', 'अग्नीचा आदिबंध', 'स्वप्नसंहिता' हे कवितासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. आता अलीकडेच त्यांचा 'युगांतर' हा कवितासंग्रह मौज प्रकाशनातर्फे प्रकाशित झाला आहे. 'उत्थानगुंफा' ते 'युगांतर' हा त्यांचा काव्यप्रवास मोठा वेधक स्वरूपाचा आहे. 'उत्थानगुंफा'ने यशवंत मनोहर यांची 'एक स्वतंत्र प्रज्ञा-प्रतिभेचा आंबेडकरवादी विचारकवी' ही ओळख निर्माण केली होती. नंतरच्या काळातील त्यांच्या कवितासंग्रहांनी त्यांची ही ओळख अधिकाधिक पक्की केली. त्यांची 'युगांतर'मधील कविता ही तर परिणतप्रज्ञ विचारदृष्टीची कविता ठरते.





यशवंत मनोहर यांची 'युगांतर'मधील कविता प्रगल्भ





आशयाची कविता आहे. कवीने आपल्या आयुष्यभर जोपासलेली विचारदृष्टी व मूल्यदृष्टी या कवितासंग्रहामधून मौलिक स्वरूपात आविष्कृत झालेली आहे. खरे तर त्यांचे यापूर्वीचे कवितासंग्रह महत्त्वपूर्ण होतेच, पण त्यांचा हा कवितासंग्रह त्यांच्या यापूर्वीच्या सर्व कवितासंग्रहांचे सामर्थ्य घेऊन आलेला कवितासंग्रह असल्याचे दिसून येते. आज यशवंत मनोहर आयुष्याच्या परिपक्व, प्रगल्भ व परिणतप्रज्ञ वळणावर उभे आहेत. अनेक प्रकारच्या खाचखळग्यांतून व डोंगरपहाडांतून खळाळत-फेसाळत वाहत आलेली नदी पुढे सागराला मिळण्याच्या टप्प्यावर येतेसमयी ज्या प्रकारे विशाल, विस्तीर्ण, सखोल आणि परिपूर्ण होते, त्या प्रकारच्या परिपूर्णतेच्या वाटेवरील सखोल व विशाल भावाशयाची कविता या कवितासंग्रहातून प्रकट होत जाते. यशवंत मनोहर यांच्या विचारदृष्टीचे विशालपण, विराटपण व नवसमाजनिर्मिकपण व्यक्त करणारा असा हा त्यांचा कवितासंग्रह केवळ मनोहरांच्या कवितेचे वळण ठरत नाही, तर तो मराठी कवितेचेदेखील निर्णायक वळण ठरू पाहतो.

'युगांतर'मधील कविता ह्या यशवंत मनोहर यांच्या मूल्यनिर्णायक प्रज्ञातत्त्वातून व देदीप्यमान प्रतिभारूपातून साकार झालेल्या कविता आहेत. या कविता केवळ आकाराच्या दृष्टीने नव्हे, तर विचारांच्या दृष्टीनेदेखील दीर्घ पल्ल्याच्या कविता आहेत. सुमारे एकशे वीस पृष्ठसंख्येच्या या कवितासंग्रहामध्ये एकूण अठरा कविता आलेल्या आहेत. ह्या कविता संख्यात्मक दृष्टीने कमी असल्या तरी मूल्यात्मक दृष्टीने अतिशय मूलगामी आहेत. स्फुट व लघू भावाभिव्यक्तीच्या पलीकडे गेलेले व संपूर्ण मानवी जीवनाचा धीरगंभीरपणे अन्वयार्थ लावू पाहणारे मनोहर या कवितासंग्रहातील प्रत्येक कवितेमधून वाचकांना भेटतात. तारुण्यकाळात सर्वव्यापक अभावग्रस्त वंचितावस्थेतून आयुष्याची सुरुवात केलेला हा कवी आज आपल्या प्रज्ञा-प्रतिभाबळावर संपूर्ण मानवी जीवनालाच कसा कवेत घेऊ पाहत आहे याचे अतीव उदात्त दर्शन या कवितासंग्रहामधून घडते.

'युगांतर' या कवितासंग्रहामध्ये आलेल्या कविता यशवंत मनोहर यांच्या जीवनभराच्या विचारचिंतनाचा परिपाक आहेत. कवी यशवंत मनोहर हे चिंतनशील, प्रगतिशील व परिवर्तनशील विचारदृष्टीचे कवी आहेत. आपल्या आयुष्यभर त्यांनी जी नवसमाजनिर्मितीची मूल्ये जोपासली व आपल्या यापूर्वीच्या लेखनातून आविष्कृत केली, ती नवसमाजनिर्मिक मूल्ये या कवितासंग्रहामधून सारभूत रूपातून प्रकट होत जातात; पण याचा अर्थ या कवितासंग्रहातील कविता कवीच्या केवळ पूर्वसंचितावर आधारलेल्या आहेत असे नव्हे. या कवीची मानवी जीवनासंबंधीची व भारतीय समाजजीवनासंबंधीची जी एक विकसनशील वैचारिक व भावनिक दृष्टी आहे, ती या कवितासंग्रहातून आणखी प्रगाढ स्वरूपात अभिव्यक्त झालेली आहे.

'युगांतर' कवितासंग्रहामधील कविता कवीच्या एकंदर जीवनदृष्टीला उजागर करणाऱ्या आहेत. या कवीची जीवनदृष्टी विजिगीषू, संघर्षशील व लढवय्या स्वरूपाची राहिलेली आहे. मानवी जीवनाला ऊर्जा देण्याची भावना ह्या कवीच्या रोमारोमात भिनलेली आहे आणि ही भावना त्यांच्या कवितांच्या अंगांगातही भिनलेली आहे. या कवितासंग्रहाच्या अर्पणपत्रिकेतूनदेखील याचे प्रत्यंतर येते. कवीने हा कवितासंग्रह 'हेमिंग्वेच्या A man can be destroyed but not defeated' या थोर ऊर्जाविधानाला...' अर्पण केला आहे. आयुष्यभर जोपासलेल्या मूल्यनिष्ठेच्या संदर्भातील कवीची ठामपणाची भूमिका येथे व्यक्त झाली आहे व या भूमिकेची प्रभा येथील कवितांवर पडलेली आहे.

'युगांतर'मधील कविता यशवंत मनोहर यांच्या विचारशील मनःपिंडातून आकारास आलेल्या कविता आहेत. विचारशीलता हा त्यांच्या कवितांचा प्राणभाव आहे. त्यांच्या कवितांना विचारांचा ताठ असा कणा प्राप्त झाला आहे. वैचारिकता हा त्यांच्या कवितांचा स्थायीभाव असला, तरी या कवितासंग्रहातील कवितांमधून कवीचे भावरूप व संवेदनारूपदेखील तितक्याच प्रभावीपणे व्यक्त होत जाते. विचार, भावना व संवेदना या तिन्ही घटकांचे प्रत्यंतर या कवितासंग्रहामधून उत्कटपणे येते. या कवितासंग्रहामधील कवितांची शीर्षके जरी पाहिली तरी ह्या कवीची भाववृत्ती, संवेदनावृत्ती व विचारवृत्ती कशी नव्या जगाच्या ध्यासाने उत्फुल्ल झालेली आहे हे लक्षात येऊ शकते. 'बिनभिंतीचे घर', 'नागड्या शब्दांसाठी निर्माण', 'एका प्रियकरपणाच्या निरंतर जन्माची कविता', 'जागतिकीकरण आणि माझ्या जगाची कविता', 'मृत्युतत्त्ववाद' ह्या व आणखीही अन्य कविता या कवितासंग्रहामधून येतात. ह्या सर्व कवितांमधून कवीचा धीरगंभीर स्वरूपाचा जीवनशोध काव्यात्म पातळीवर आकारास येताना दिसतो. या कवितासंग्रहामध्ये आलेली प्रत्येक कविता कवीच्या जीवनचिंतनाचा धीरगंभीर असा परिपाक आहे. येथील प्रत्येक कविता कवीच्या

जीवनदृष्टीची प्रतीती देणारी आहे. एकंदर मानवी जीवनासंबंधीचे आणि त्यातही भारतीय समाजजीवनासंबंधीचे कवीचे विशिष्ट स्वरूपाचे मूल्यात्मक आकलन येथील प्रत्येक कवितेमधून ठाशीवपणे अभिव्यक्त झाले आहे.

कवी यशवंत मनोहर या कवितासंग्रहामधून जो जीवनशोध घेतात तो मोठा वैशिष्ट्यपूर्ण आहे, त्याचप्रमाणे तो लोकविलक्षण स्वरूपाचा आहे. ज्या समाजसमूहाला भारतातील प्रस्थापित विषमताधिष्ठित समाजव्यवस्थेने घरदार व गावशिवार नाकारले, त्या समाजसमूहाचे प्रतिनिधित्व करणारे कवी मनोहर 'बिनभिंतीचे घर' या पहिल्याच कवितेतून 'अंधाराचेच छत, अंधाराच्याच भिंती' असणारे गतकालीन आणि समकालीन असे दोन्ही प्रकारचे जीवनवास्तव उभे करतात. आज स्वातंत्र्याची सहा दशके उलटून गेल्यानंतरही 'कुठे आहे माझे घर?/ देशात? गावात? हवेत?/ की शब्द हेच माझे घर?/ माझी तडफड हेच माझे घर?/' ही कायमच असलेली अवस्था येथे ते अंतःकरणाच्या ऊर्मीतून शब्दबद्ध करतात. पण कवीची ही तडफड एका वेगळ्या दिशेच्या जीवनसाफल्याची तडफड आहे. 'विश्वास या शब्दाचा आकार दिसतो ना/ तेच आहे माझे घर/ बुद्धिवादाचा बोधिवृक्ष दिसतो ना/ तेच आहे माझे घर/ ती किनारे नसलेली कविता दिसते ना/ तेच आहे माझे घर/' (यशवंत मनोहर, 'युगांतर', 'बिनभिंतीचे घर', मौज प्रकाशन, मुंबई, २ ऑक्टोबर २०१५, पृ. ३), अशी विश्वोत्तीर्ण घराची कल्पना ते येथे रेखाटतात. आपल्या किनाऱ्यांच्या पलीकडे जाणाऱ्या कवितांमधून विश्वासाई बुद्धिवादाचा बोधिवृक्ष साकार करू पाहणारी त्यांची कविता एका बाजूने अतृप्त मनाने जीवनशोध घेते व दुसऱ्या बाजूने जीवनसाफल्याची तडफड व्यक्त करते.

'युगांतर'मधील कवितांमधून प्रकटणारा जीवनशोध हा मानवी जीवनाच्या स्वस्थतेकरिता व सुखावहतेकरिता चालणारा जीवनशोध असला, तरी तो मुळात अस्वस्थ, अशांत, अतृप्त मनाने घेतला जाणे हे क्रमप्राप्तच ठरते. वंचित वर्गातून पुढे आलेल्या व्यक्तीकरिता ही निर्वाणाअगोदरची पीडा त्यांनी स्वीकारलेल्या जीवनमार्गाची अत्यावश्यक अशी उपलब्धी असते. त्यामुळेच मनोहर येथे 'नागड्या शब्दांसाठी निर्वाणा'ची मांडणी करतात. येथे कवी स्वतःचे शब्दबहिष्कृतपण भावोद्रेकी पद्धतीने मांडतात. 'स्वतंत्र शब्द नावाचे बृहत् जगणे' तोडले गेलेल्या जीवनामध्ये 'बिनपालवीचे झाड असण्याची' व 'चांदण्याचा पिसारा उपटलेला चंद्र असण्याची' सक्ती कवीला 'नागड्या' शब्दांकरिता निर्वाणाची भाषा करण्यासाठी प्रवृत्त करते. 'मी गुलामीची जाणीव करून दिली शब्दांना / मी मिळवले बंड करून उठणारे शब्द./ माझ्या नागडेपणाला जागा नव्हती सवस्त्रांच्या जगात/ आणि परंपरांचे वर्गीकरण करून/ माझ्या नागडेपणाने जन्माला घातला/ तो शब्द नागडाच होता ः/ सत्यासारखा नागडा, सूर्यासारखा नागडा/ अशा नागड्या शब्दासाठीच मी निर्वाण मांडले होते/ आता माझ्या सर्व नागड्या शब्दांना/ मी भारतीय संविधानाचे प्रीॲम्बल नेसवले आहे./' (नागड्या शब्दांसाठी निर्वाण, पृ. ११) नागड्या शब्दांसाठी निर्वाण मांडणारे कवी भारतीयच संविधानाच्या आधारे येथील अभावग्रस्तांच्या जीवनाचा अर्थपूर्ण शोध घेऊ पाहतात.

कवीने घेतलेला जीवनशोध हा वैविध्यपूर्ण स्वरूपाचा आहे. जीवनाची अनेकार्थता व व्यामिश्रता, तसेच त्यातील परस्परसुसंगतता समजून घेत त्यांची कविता पुढे येत जाते. गतकाळापासून तर समकाळापर्यंतच्या स्वतःच्या व समाजाच्या जीवनप्रवासाला आणि त्यातील चढउतारांना ती सूक्ष्मपणे समजून घेते. ह्या जीवनप्रवासातील गतकालीन प्रेमजीवनदेखील कवीला आजच्या कालखंडात एकूणच प्रेमभावनेचा नव्याने विचार करण्यासाठी प्रवृत्त करते. त्यांच्या कवितेला 'भोवतीच्या सार्वत्रिक आगीत/ प्रतिभा होरपळत आहे माझी/ निरंतर./ खरंच सांगतो/ तिला प्रेमकविता नाही सुचणार आता/' याचे कालसापेक्ष भान पुरेपूर आहे. पण 'कालपरवापर्यंत माझ्यातील अनादी/ प्रियकराने साहिला एक अखंड मृत्यू' ही कविमनाला अखंड टोचणी देणारी जाणीव 'आता तर स्वतःला जाळून घेतोय मी/ नवलाच्या नवनव्या आगीत' अशा सततच्या दग्धतेपर्यंत वृद्धिंगत होत जाते. 'ती झाली नाही माझे पंख/ म्हणून कल्पनांच्या पंखांनीच मी/ नकारांच्या नभात उडत राहिलो.../ दिवसागणिक माझ्या दुःखाचा अवकाश/ वेडावाकडा वाढतोच आहे सोबतीने/ ती नदी झाली नाही जीव ओतणारी कायमसाठी/ आणि तिची वाट पाहत एक समुद्र राहिला आहे कोरडाच/ त्यात वाढले आहे अनादी दुःखाचे अरण्य/ या अरण्याचा परीघ आता जगाएवढा होतो आहे' ('एका प्रियकरपणाच्या निरंतर जन्माची कविता', पृ. १५). तरुणपणातील कधीकाळचा प्रेमभाव हा तेथेच खंडित न होता कवीच्या प्रियकरपणाला कसा जळत-जाळत तेवत ठेवत असतो याची दिव्यदाहक प्रचिती त्यांच्या 'एका प्रियकरपणाच्या निरंतर जन्माची कविता' या कवितेमधून येते.

कविव्यक्तित्वातील अनादी प्रियकरपणाचा हा आदिबंध मोठा विलक्षण मानावा लागतो आणि तो कविमनाच्या एकूणच प्रेमभावनेचे व प्रेमतत्त्वाचे उदात्तीकरण करणारा ठरतो.

मनोहरांची 'युगांतर'मधील कविता ही समकाळाशी घट्ट नातेसंबंध असलेली कविता आहे. समकालीनता हा खरे तर त्यांच्या एकंदर साहित्यलेखनाचाच महत्त्वपूर्ण विशेष होय. मनोहर हे आपल्या लेखनातून जे काही विधान करतात ते समकालीन वास्तवाच्या सजग जागरुकतेमधून आकारास आलेले विधान असते. आपल्या अवतीभवतीची समकालीन परिस्थिती हा त्यांच्या एकंदर साहित्याच्या चिंतन-मननाचा विषय आहे, त्याचप्रमाणे तो 'युगांतर'मधील कवितांचादेखील मौलिक असा विशेष आहे. मागील पाव शतकाच्या कालखंडापासून भारतामध्ये जागतिकीकरणाचा जो उदय झाला आणि मागील दशकभराच्या कालखंडापासून त्याच्या तीव्रतेच्या ज्या कळा-झळा पोषक-शोषक रूपातून येथील समाजाला सोसाव्या लागल्या, त्याची संगती लावण्याचा प्रयत्न मनोहर 'जागतिकीकरण आणि माझ्या जगाची कविता' या कवितेमधून करतात. जागतिकीकरणाच्या प्रक्रियेचे व या प्रक्रियेच्या वैविध्यपूर्णतेचे वैचारिक आणि तरीही काव्यात्म पातळीवरील आकलन या नात्याने त्यांची ही कविता लक्षणीय ठरते. भारतातील वंचित समाजासाठी जागतिकीकरण कोठे सुसंगत व कोठे विसंगत ठरते, यासंबंधीची कवीची भूमिका या कवितेतून प्रभावीपणे अभिव्यक्त झाली आहे. 'जागतिकीकरणा!/ परिवर्तनाचा लेक म्हणून तू अपरिहार्य आहेस/ विज्ञान तुझा बाप आहे;/ पण आमच्या गुलामीच्या शिल्पकारांच्या आजच्या वारसांनी/ तुला भोगवादाचे खत घातले/ तसे स्वयंकेंद्रितता, मूल्यशून्यता, हिंसा आणि मनुष्यअंत/ असे सर्व अनर्थांचे पीक तुझ्या वावरात यायला लागले/...' (जागतिकीकरण आणि माझ्या जगाची कविता, पृ. २२) या शब्दांत ते जागतिकीकरणाच्या प्रक्रियेचे वंचितकल्याणाच्या दृष्टीतून स्वागत करतात. 'जागतिकीकरणा!/ तुझ्या गतीच्या झपाटलेपणाचे बोट धरून/ आम्ही अडचणीच्या वाटा चालू/ पण भांडवलदारांनी आणि समाजवाद्यांनी/ तुझे विकृत रूप चितारून/ आम्हाला आमच्या भूतकाळातील गुलामीशी बांधू नये/...' अशी भूमिका या कवितेतून पुढे येते. 'तुझ्याच तेजाच्या समाजवादी किल्लीने आम्हाला/ आमच्या विजयाचे महाद्वार उघडायचे आहे./' या प्रकारचे जागतिकीकरणासंबंधीचे वैचारिक तरीही काव्यात्म पातळीवरील आकलन या कवितेतून प्रकट होते.

यशवंत मनोहरांची 'युगांतर'मधील कविता जीवनासंबंधी सुनिश्चित भूमिका असलेली व ठाम आशयाची कविता आहे. मानवी जीवन, त्यातही भारतीय समाजजीवन म्हणजे प्रागतिक आणि पारंपरिक यांच्यातील जीवनसंघर्षाचा इतिहास आहे. प्रस्थापित आणि वंचित, जाती-वर्ण-वर्ग-वर्चस्ववादी आणि समतावादी, पुराणमतवादी आणि नवमतवादी, अलौकिकवादी आणि लौकिकवादी, मूलतत्त्ववादी आणि प्रगतिवादी, सामंतवादी आणि लोकशाहीवादी यांच्यातील संघर्ष सनातन स्वरूपात चालत आलेला आहे आणि या संघर्षामध्ये परिवर्तनवादी मंडळींना ठाम भूमिका घेऊन प्राणपणाने लढा दिला पाहिजे, ही भूमिका त्यांच्या अन्य काव्यसंग्रहांप्रमाणे याही कवितासंग्रहातून पाहावयास मिळते. 'मृत्युतत्त्ववाद' ही त्यांची कविता या संबंधात पाहण्यासारखी आहे. मृत्युतत्त्ववादी लोकांची एक कोटी कल्पून त्यावर तुटून पडताना कवी लिहितात, 'तुम्ही नसता तर फुलांना आले असते बोलता/ चांदण्यांना आले असते नाचता/ माणूस राहिला असता सूर्यकिरणासारखा/ झाला नसता स्वतःला पारखा./ तुम्ही केलीत पृथ्वीवरील नक्षत्रांच्या बागांची स्मशाने/ तुम्ही घृणेला प्रेमाच्या शाळेत नाही जाऊ दिले. / तुम्ही हवेला तलावात कोंडले/ नव्या पालवीच्या भीतीने तुम्ही/ झाडांना नजरकैदेत ठेवले./ तुम्ही मृत्युतत्त्ववादी/' (मृत्युतत्त्ववाद', पृ. २६)- या प्रकारच्या आवाजी स्वरात मनोहरांची कविता मूलतत्त्ववादी विचारांवर शब्दप्रहार करताना दिसते. त्यांच्या 'वळसे' या कवितेमध्ये वळसे घेत विसंगतपूर्ण वर्तन-व्यवहार करणाऱ्या प्रवृत्तीसंबंधीचा दंभस्फोट व्यक्त होत जातो. कवीने केलेले हे शब्दप्रहार व केलेला दंभस्फोट खास त्यांच्या शैलीमध्ये अलंकारिक शब्दरूपात व प्रतिमा-प्रतीकांच्या काव्यभाषेत अभिव्यक्त होतो आणि तो वाचनीय रूप धारण करतो.

'युगांतर'मधील 'माणसे' या कवितेमधून कवी यशवंत मनोहर यांनी आपल्या अवतीभवतीच्या माणसांची विविध रूपे-प्रारूपे वेधकपणे व्यक्त केली आहेत. सभोवतालच्या जीवनाच्या समरांगणात लढत जाणाऱ्या आणि माणुसकीचा ध्वज लढवय्या वृत्तीने उंचावत ठेवणाऱ्या माणसांविषयीचा आदरभाव व्यक्त करताना ते लिहितात, 'मला दिसताहेत माणसे/ सागराप्रमाणे बेफाम झालेली/ आपल्या हातांतील क्रांतीचे फलक झालेली/ मला दिसताहेत माणसे/ भुका बांधून रणाकडे धावणारी/



**कवीने घेतलेला जीवनशोध हा वैविध्यपूर्ण स्वरूपाचा आहे. जीवनाची अनेकार्थता व व्यामिश्रता, तसेच त्यातील परस्परसुसंगतता समजून घेत त्यांची कविता पुढे येत जाते. गतकाळापासून तर समकाळापर्यंतच्या स्वतःच्या व समाजाच्या जीवनप्रवासाला आणि त्यातील चढउतारांना ती सूक्ष्मपणे समजून घेते. ह्या जीवनप्रवासातील गतकालीन प्रेमजीवनदेखील कवीला आजच्या कालखंडात एकूणच प्रेमभावनेचा नव्याने विचार करण्यासाठी प्रवृत्त करते.**

चांदणे वाचवण्यासाठी वणव्यात घुसलेली/' (माणसे', पृ. ३०). सर्व प्रकारच्या समस्यांवर मात करून परिवर्तनाची कास धरणारी माणसे कवीला सतत वंदनीय वाटत राहतात. त्यामुळे 'मलाला' या मुलीची नवजीवन घडविण्याची धडपड कवीला 'तू नवी रेलेव्हंट कविता/ उरात सूर्य पेटलेल्या कवीची' अशी मूल्यात्मक वाटते. मानवी जीवनातील नाना प्रकारच्या विसंगतींवर मात करण्याची जिद्द ही या समाजाच्या नवसंरचनेची प्रक्रिया होय, यावर त्यांचा पुरेपूर विश्वास आहे. जीवनमरणाच्या संघर्षात उतरलेल्या मानवी जिद्दीचे वर्णन करताना कविमनातील भावकल्लोळांना शब्द-प्रतिमांचा भरगच्च फुलोरा येतो. 'ती खेळते विजांची लगोरी/ ढगांच्या भयानक गडगडाटांचा हार घालते गळ्यात/ सूर्यकिरणांनी बांधते जखमा वाऱ्याच्या/ पोहते प्रवाहाच्या विरुद्ध प्रकाशदिशेने/ पायी चालता चालता घेते/ आकाशाचा अंत पाहणारी उड्डाणे / फोडते ज्ञाताच्या पाषाणभिंती/ काळाच्या स्थितिशील पहाडात काढते बोगदे/ चंद्राच्या कानाला लावते पृथ्वीचा मोबाइल/ अंतराळाची वेबसाइट अंथरते माणसाच्या नजरेत/ दारे उघडून काळाच्या धरणाला करते प्रवाही/ देव-दैवाला देते जाहीर मूठमाती/ नियतीच्या दराऱ्याच्या करते चिंध्या/ जिद्द अशी गोष्ट आहे विनाशा/ जी मरत नाही कोणत्याही मरणाने कधीही/ ('जिद्द' पृ. ३५). मानवी जिद्दीवरचा कवीचा अफाट विश्वास व्यक्त करणारी त्यांची 'जिद्द' ही कविता एकंदर संघर्षरत लढवय्येपणावर प्रकाश टाकणारी आहे.

यशवंत मनोहर यांच्या 'युगांतर' कवितासंग्रहातून कविव्यक्तित्वाचे आविष्करण अत्यंत प्रभावीपणे झालेले आहे. कविव्यक्तित्वाचे नाना प्रकारचे आविष्कार येथील कवितांमधून पाहावयास मिळतात. शून्यापासून प्रवास सुरू करणाऱ्या या कवीचा विश्वात्मक होत जाणारा प्रवास मोठा प्रेरणादायी ठरतो. मनुष्यत्वावर व जीवनार्थावर अपार विश्वास असलेला हा कवी आपल्या मूल्यभावाची सत्यात्मकता ठाम शब्दांत व्यक्त करताना म्हणतो, 'सत्याला पर्याय असावा सत्याचाच/ असत्य हा पर्याय ठरू शकत नाही सत्याला/ समतेला पर्याय असतो समतेचाच/ विषमता हा पर्याय ठरू शकत नाही समतेला/ विषमतेचा आणि असत्याचा विजयच ठरतो माणसाचा पराभव./... मी क्रौर्याच्या महावृक्षाला सांगतो/ निर्वाणीच्या भाषेत :/ सत्याचा पराभवच असतो माणसाचा पराभव/ आणि उद्ध्वस्त झाले तरी/ सत्य होणार नाही पराभूत/ होईल तेजःपुंज अधिकच/ असत्याच्या हल्ल्यांनी/ या निष्कर्षाचा माझा कणा वाकतही नाही/ मोडतही नाही' ('सत्य', पृ. ७३). 'सत्य' या कवितेतील कवीची ही जीवनदृष्टी मुळात त्यांच्या प्रखर व अविचल विचारनिष्ठेतून आकारास आलेली आहे आणि ती कवीच्या मूल्याधिष्ठित व्यक्तिमत्त्वाचा अविभाज्य भाग आहे.

'युगांतर'मधील कवितांचा एक अत्यंत महत्त्वाचा विशेष म्हणजे त्यातून प्रकटलेले कवी व काव्यविषयक चिंतन हे होय. मनोहरांची काव्यवृत्ती, त्यांची काव्यनिष्ठा व त्यांची काव्यदृष्टी या कवितासंग्रहातून भरभरून अभिव्यक्त झाली आहे. कविता आणि मनोहर यांचे नाते कसे अभिन्न स्वरूपाचे आहे याची सायुज्यतापूर्ण प्रतीती या कवितासंग्रहामधून पाहावयास मिळते. 'हे कवी!', 'कविता', 'आई प्रतिभे!', 'निर्मिती' या त्यांच्या कविता कवी व काव्यविषयक चिंतन व्यक्त करणाऱ्या आहेत. मनोहर यांच्या या कवितांमधून प्रकट झालेले कवी व काव्यविषयक चिंतन मोठे मूल्यगर्भ आहे. कवी हा विचारवंतांप्रमाणे व समाजचिंतकांप्रमाणे जीवनमूल्यांची प्रतिष्ठापना करण्यासाठी कसा प्रतिबद्ध असतो याचा नितांत रमणीय वस्तुपाठ म्हणजे त्यांची ही कविता होय. 'हे कवी!/ भोवतीच्या जखमांकडे मी पाठ फिरवली/ तर बेलाशक माझा मृत्यू जाहीर कर/ माझा वंचितांसोबत चाललेला संवाद थांबला/ तर मला न विचारताच माझा अस्त जाहीर कर' ('हे कवी', पृ. ३७), असे

बिनदिक्कतपणे म्हणणारे कवी येथे येतात. 'हे कवी! ज्या दुःखांनी आवळला आहे गळा दुनियेचा/ त्या दुःखांच्या मुळाशी भांडत राहू दे मला/ आटोक्यात येत नाही आग दुनियेला लागलेली/ या वेळी हजार हातांचे अग्निशामक होऊ दे मला' ('हे कवी', पृ. ४६), या शब्दांमध्ये कवीची काव्यनिष्ठा व सोबतच जीवननिष्ठा येथे आकारास येत जाते. 'हे कवी!' ही यशवंत मनोहर यांची दीर्घकविता त्यांच्या अपरंपार काव्यनिष्ठेतून व जीवननिष्ठेतून आकारास आलेली आणि त्या जीवननिष्ठेमध्ये कृतकृतार्थ होत जाणारी कविता आहे. कवितेच्या संबंधातील कवीच्या जाणिवा मोठ्या जीवनसंवेद्य स्वरूपाच्या आहेत. काळजीच्या डोळ्यांतील आसवांप्रमाणे असणारी कविता त्याच काळीजओढीतून त्यांच्या कवितांमधून सतत अभिव्यक्त होत जाते. त्यांच्या कवितेमधून होणारा भाषाविष्कार कधी विलोभनीय, तर कधी प्रलयांकित रूपात आविष्कृत होत जातो. 'कविता : काहीशी शब्दांमध्ये राहते, खूपदा शब्दांबाहेर भिरभिरते, / काळजांची बेटे शिवणारा सुईदोरा होते कविता/ कविता गरीब झोपड्यांमध्ये खेळणाऱ्या नागड्या ठिणग्यांसारखी/ वाऱ्याची, वाटांची आणि युगांची दिशा बदलून देते कविता/ ('कविता', पृ. ५०). अशा विविधांगी काव्यमोहोरांनी लगडलेली त्यांची काव्यसृष्टी मोठे वाचनीय स्वरूपात आकारास येते आणि सोबतच ती व्यापक जीवनभाष्य करीत जाते. या प्रगाढ जीवननिष्ठेमधून त्यांची कविता आई प्रतिभेचा गुणगौरव करीत जाते. 'आई प्रतिभे! उजेडांच्या वैश्विक महासंगीताच्या परम शिष्ये / मी खुळा लेक तुझा तुझ्याच प्रज्ञानी हाताने / अग्निवादळाच्या थैमानात लिहितो कविता,' या शब्दांत प्रतिभेला सलाम करीत त्यांची कविता कवितासर्जनाचा सोहळा जीवनभूमिकेतून सजवीत जाते. कधी कवीशी, कधी कवितेशी, कधी काव्यरूपाशी, कधी काव्यप्रतिभेशी विविध पातळ्यांवरून संवाद साधीत त्यांची कविता अभिव्यक्त होत जाते आणि ती कवितेच्या सामाजिक भवतालाला कवेत घेत जाते.



**स्त्री-पुरुष समत्वभाव हा यशवंत मनोहर यांच्या एकंदर विचारचिंतनाचा महत्त्वपूर्ण गुणविशेष आहे. हा गुणविशेष या कवितासंग्रहातील 'मायबाई!' या कवितेतून विलक्षण ताकदीने प्रकट झालेला आहे. मायबाई ही मनोहर यांची चाळीस पृष्ठांची दीर्घकविता आहे. या कवितेमधून कवीचे स्त्रीजातीविषयीचे विचारचिंतन व्यापकपणे व विस्तृतपणे अभिव्यक्त झाले आहे.**

'युगांतर' या कवितासंग्रहाची सर्वांत लक्षणीय मौलिकता म्हणजे या कवितासंग्रहातून प्रकट झालेले स्त्रीविषयक विचारचिंतन हे होय. स्त्री-पुरुष समत्वभाव हा यशवंत मनोहर यांच्या एकंदर विचारचिंतनाचा महत्त्वपूर्ण गुणविशेष आहे. हा गुणविशेष या कवितासंग्रहातील 'मायबाई!' या कवितेतून विलक्षण ताकदीने प्रकट झालेला आहे. मायबाई ही मनोहर यांची चाळीस पृष्ठांची दीर्घकविता आहे. या कवितेमधून कवीचे स्त्रीजातीविषयीचे विचारचिंतन व्यापकपणे व विस्तृतपणे अभिव्यक्त झाले आहे. आपले समाजजीवन व या समाजजीवनातील सर्व प्रकारचे वर्तन-व्यवहार पुरुषकेंद्री स्वरूपाचे असताना ह्या पुरुषकेंद्रित्वाला बाजूला सारत स्त्रीकेंद्री विचारदृष्टीचे आविष्करण या कवितासंग्रहातून प्रभावीपणे व्यक्त होते. या कवितेचे 'मायबाई' हे शीर्षक मुळात विलक्षण बोलक्या स्वरूपाचे आहे व कवीच्या एकंदर स्त्रीविषयक विचारदृष्टीचे प्रत्यंतर देणारे आहे. संपूर्ण मानवी जीवनाचा तोल स्त्रीजीवनावर व स्त्रीरूपावर सांभाळला गेलेला आहे आणि स्त्रीत्व हेच या विश्वाचे आदितत्त्व तसेच मूलतत्त्व आहे, ही भूमिका या कवितेतून प्रदीर्घपणे व्यक्त झाली आहे. 'निसर्गसृष्टी :/ धरित्रीच्या पोटी जन्मलेले सुखदुःखांचे महाकाव्य/ तू प्रतिधरित्री :/ तुझ्या गर्भातून उमलले अनंत महाकाव्यांना/ पुरून उरणारे अथांग विराट मानवी सृष्टीचे/ ज्याच्या गुंतागुंतीचा थांग लागला नाही कोणालाही/... मानवी जीवनाची कहाणी/ निर्वातातून सुरू झालेली। तुझ्या फांद्यांच्या अनंत विस्ताराची कहाणी आहे' ('मायबाई!', पृ. ७९), या शब्दांपासून त्यांची ही कविता सुरू होते आणि मायबाईच्या दुधाच्या फुलवऱ्यावर पोसल्या गेलेल्या विश्वाचा स्त्रीकेंद्री उत्क्रांतपट उलगडण्याचा प्रयत्न करते. सृष्टीप्रमाणेच अगम्य, अथांग असणाऱ्या स्त्रीजातीचा, स्त्रीरूपाचा व स्त्रीजीवनाचा शोध कवी येथे स्त्रीकेंद्री विचारदृष्टीतून घेत जातात व त्यातून स्त्रीजीवनाची मौलिकता शब्दबद्ध करीत जातात. हे करताना स्त्रीजीवनाला बंदिस्त करणाऱ्या धर्मव्यवस्थेवर व



अनुक्रमणिका

समाजव्यवस्थेवर ते कटू भाष्य करीत जातात, त्याचप्रमाणे पददलित ठरलेल्या स्त्रीउन्नतीचा मार्ग कोणता राहू शकतो याचीही मूल्याधिष्ठित मांडणी ते येथे करीत जातात. येथील तळपातळीवरील दलित-वंचित समाज काय, येथील कष्टकरी-श्रमजीवी मजूरवर्ग काय, येथील शेतकरी-शेतमजूर काय किंवा येथील समस्त स्त्रीजात काय, यांच्यामध्ये जे शोषणाचे अंतःसूत्र राहिले आहे त्यावर विचारभाष्य करताना ते लिहितात, 'मायबाई...!/ आपण एकाच आगीत जळत आहोत/ नव्हते आपणाला स्वप्न पाहण्याचे स्वातंत्र्य/ नव्हता आपल्याला आपल्या मर्जीचा/ श्वास घेण्याचा अधिकार/ आपल्या पावलांना नव्हता आवडीचा रस्ता/ निवडण्याचा अधिकार./...आपण खुरटत राहिलो आपल्याभोवती/ पसरलेल्या वाळवंटात/ आपण झडत राहिलो शिशिराशिवाय कायम बाहेर आणि आतल्या आत/ आपण वाहत राहिलो ओंडक्यांसारखे पुरात कायम/ आपण मरत राहिलो हजारो वर्षे मेल्याशिवाय/ मायबाई...!/ जिवंतपणीच जाळत आल्या आपल्याला आपल्या चिता/ तूच हो आता युद्धभूमीवरील क्रांतीची कविता' ('मायबाई!', पृ. १०३). स्त्रीजीवनाचे युगांपासून अव्याहत चालत आलेले वंचित क्षण मांडत त्यांची कविता पुढे येत जाते आणि ती स्त्रीमुक्तीचा विचारमार्ग प्रशस्त करीत जाते. येथील पुरुषप्रधान समाजव्यवस्थेने उपेक्षित व शोषित-वंचित ठेवलेली स्त्री ही कितीही दुय्यम मानली गेली तरी ती दुय्यम राहूच शकत नाही, याची स्पष्ट कल्पना असलेली जीवनजाणीव या कवितेच्या ओळीओळींतून व्यक्त झाली आहे. स्त्रीजातीमुळेच पृथ्वीपाठीवरील संपूर्ण मानवी जीवन आकारास आलेले असल्यामुळे तिच्याबद्दल कृतार्थतेची भावना आपण आपल्या तना-मनात जन्मभर जरी वागवली तरी तिचे पांग फेडता येणार नाही, या भावनेने ही कविता प्रवाहित झाली आहे. 'मायबाई...!/ तू निर्मिलेल्या अनंत नात्यांची मी बेरीज :/ एक प्रातिनिधिकता गुंतागुंतीची / तू माझ्या जीवनाची पहिली पहाट/ तू आरंभ माझ्या लाखो वर्षांच्या प्रवासाचा / माझी खर्व-निखर्वाची आजी तू / पण काहीही म्हटले तरी/ काळाचा लाखो वर्षांचा प्रवास तुडवून आलेल्या / तुझ्याच रक्ताच्या मोहोरातला/ एक रक्तथेंब मी / तुझाच एक प्रकाशबिंदू मी/' ('मायबाई!', पृ. ११३), या शब्दांमध्ये कवी स्वतःचे स्त्रीजीवनाशी असलेले आदिबंधात्मक नाते व्यक्त करतात. कवी या कवितेमधून आत्मनिष्ठ भावपरतेतून बोलत असले तरी ते त्यामधून सबंध मानवजातीचा मुळारंभ या नात्याने स्त्रीजातीकडे, स्त्रीरूपाकडे व स्त्रीत्वाकडे पाहतात. यशवंत मनोहर यांची 'मायबाई!' ही दीर्घकविता या प्रकारे स्त्रीत्वाचा व स्त्रीरूपाचा गुणगौरव करणारी आहे. स्त्री हे सृष्टीचे मूलतत्त्व असल्याचे विचारसूत्र प्रदीर्घ स्वरूपात मांडणारी ही कविता एकंदर मराठी काव्यसृष्टीत लक्षणीय कविता ठरते.

'युगांतर'मधील एकंदर ही मराठी चिंतनपर काव्यपरंपरेला समृद्ध करणारी कविता आहे. 'उत्थानगुंफा' या कवितासंग्रहातून यशवंत मनोहर हे 'ज्वालांचे निःश्वास हुंकारत आलेला कवी' या बिरुदावलीने पुढे आले होते. 'उत्थानगुंफे'तील विचारकविता ही रौद्रसुंदर व क्रूरकोमल अशी विचारकविता होती. तेव्हापासून सातत्यपूर्ण काव्यप्रवास करणाऱ्या मनोहरांची 'युगांतर'मधील विचारकविता एका उदात्तसुंदर परिणतप्रज्ञतेच्या वळणापर्यंत येऊन पोहोचली आहे. मात्र, कवीची ही उदात्तसुंदर परिणतप्रज्ञता अद्यापही धुमसणारी, थडथडणारी आणि सतत स्पंदित होणारी अशीच आहे. कवी हे आज मराठी साहित्यविश्वातील प्रस्थापित कवी व लेखक असले तरी त्यांचे कविमन मात्र अद्याप विस्थापितच आहे. म्हणूनच ते विस्थापितांच्या भाव-भावना, त्यांचे विचार-विकार, त्यांची सुख-स्वप्ने पोटतिडकीने शब्दबद्ध करतात. आजच्या मध्यमवर्गीय पांढरपेशा सुखवस्तुपणाच्या व सुस्थिरपणाच्या कालखंडात कवी स्वतःतील अस्वस्थता जिवंत ठेवत त्या अस्वस्थ मनाने काव्याविष्कार करीत जातात, ही बाब आजघटकेस महत्त्वपूर्ण ठरते. आपली काव्यनिर्मिती ही अस्वस्थपणाची व घुसमटीची निर्मिती असल्याचे त्यांनी 'निर्मिती' या कवितेत स्पष्ट केले आहे. 'पुरातच वाहत राहावे एखादे झाड निरंतर/ तशी अस्वस्थता विझू देत नाही/ माझ्या डोक्याला/ उजेडातही आणि अंधारातही' असे कवीने म्हटले आहे. 'थांबू दिले नाही या घुसमटीने/ होऊ दिले नाही मला समाधानी/ तिने करायला लावली मला गंभीर अवकाशाची निर्मिती/ करायला लावले त्याचे बाळंतपण/ सुरुंगावर उभे राहून/ आता वाटते आपण अस्वस्थतेची निर्मिती आहोत/ तिने अंगाराचा पान्हा पाजला आपल्याला/ आणि जगवले/ मला छळले नसते, जाळले नसते मरणाने क्षणोक्षणी/ तर मी मरूनच गेलो असतो./ जगणे सुरू होण्याआधी' ('निर्मिती', पृ. ७६-७७), या शब्दांमध्ये कवी स्वतःची अस्वस्थपणाची निर्मिती येथे व्यक्त करतात. कविमनात धुमसत असणारा प्रस्थापित विषमतावादी विचारव्यवस्थेविरुद्धचा जाळ त्यांच्याकडील अनन्यसाधारण शब्दकळेमुळे मोहक रूप

धारण करतो व तो काव्याविष्कार मोठा आकर्षक ठरतो.

कवी यशवंत मनोहर यांची 'युगांतर'मधील कविता ही आपल्या समाजव्यवस्थेतील विषमताधिष्ठित तत्त्वांविरुद्ध लढा देणारी कविता आहे. या कवितेला भारतीय संविधानदृष्टीमधून व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारदृष्टीतून व्यवस्थाबदल व मूल्यबदल घडवून आणायचा आहे. या कवीचे व त्याच्या कवितेचे स्वप्न हे युगांतराचे आहे. येथील समाजरचनेला निकोप व जगण्यायोग्य करण्यासाठी बुद्ध-फुले-आंबेडकरी विचारदृष्टीशिवाय दुसरा मार्ग राहू शकत नाही, ही कवीची ठाम भूमिका आहे आणि ती त्यांच्या आयुष्यभराच्या विचारचिंतनातून आकारास आलेली आहे. पण या विचाराबरोबरच युगांतर करण्यासाठी तशा प्रकारच्या भावना-विचारांनी आसुसलेले मन लागते याचीही कवीला सुस्पष्ट जाणीव आहे. आणि ही युगांतराची प्रक्रिया सहजसोपी नाही याचीही त्यांना कल्पना आहे. त्यामुळे ह्या युगांतरासाठी भावना आणि विचार या दोन्ही पातळ्यांवर सतत लढा देत राहणाऱ्या युगनायकाची विराट प्रतिमा त्यांच्या कवितेतून व्यक्त होत जाते. 'युगांतर' या कवितासंग्रहात त्याच शीर्षकाच्या कवितेमधून ही लढवय्या युगनायकाची प्रतिमा प्रचंड ताकदीने साकार झाली आहे. या कवितेतून यशवंत मनोहर यांचे युगांतरासाठी तडफडणारे भावरूप व विचाररूप समजून घेता येऊ शकते.

युगांतरासाठी आसुसलेला संघर्षशील विराट कवी याप्रमाणे रेखाटतात : 'एका मर्द निर्धाराने सीमा उद्ध्वस्त केल्या साऱ्या/ आणि उभा राहिला माथ्यात नागडे आभाळ घेऊन/ थरथर कापणाऱ्या रस्त्यावर/ पसरल्या त्याने आव्हानांच्या ज्वाळा/ आणि त्याचा निर्णायक पहाड/ चालत गेला युद्धभूमीकडे/ पेटलेले तारांगण मुठीत घेऊन/ काळाचे धुमसते गाठोडे पाठीवर घेऊन/ तो वाऱ्याच्या पुरात शिरला/ स्वतःभोवतीच फिरत त्याला बोलावणारे/ चक्राकार वाहन त्याने लाथाडले/ त्या वाहनाने दिलेले मनही त्याने भूतकाळावर फेकले/ आणि झाला प्रकाशाच्या वेगावर स्वार/ शेवट नसलेले अंतराळ चिमटीत पकडण्यासाठी/ त्याने तुडवले वणव्यांचे टापू /त्याचे हातपाय झालेले होते रक्तबंबाळ/ आणि त्याच्याभोवती भडकला होता युगांतराचा जाळ' ('युगांतर', पृ. ७८). येथे शब्दबद्ध केलेला हा लढवय्या युगनायक कविप्रतिभेची अपूर्व निर्मिती होय. नवव्यवस्था निर्माण करण्यासाठी विषमताविरुद्ध संघर्षरत राहणारा आणि त्या जीवनमरणाच्या संघर्षात जीवनसाफल्याकरिता निर्णायकपणे लढत राहणारा युगनायक मनोहरांच्या प्रज्ञा-प्रतिभेचे व त्यांच्या एकंदर कविव्यक्तित्वाचे फार मोठे बलस्थान होय. मनोहरांच्या 'युगांतर' या कवितेमधून निर्णायक युगांतरासाठी पेटलेला हा भावकल्लोळांचा व विचारकल्लोळांचा जाळ मोठा मूल्यवेधक आहे तसाच तो मोठा मनोहारीही आहे. आणि ह्या युगांतरासाठी पेटलेल्या जाळाची प्रभा या संपूर्ण कवितासंग्रहावर पडलेली आहे. कवी यशवंत मनोहर यांना कविप्रतिभेचे, शब्दप्रतिभेचे व प्रतिमाप्रतिभेचे अपूर्व देणे स्वयंसाधनेने लाभले आहे व त्यांनी ते प्रयत्नपूर्वक सिद्ध केले आहे. समकालीन मराठी कवितेमध्ये मनोहर यांची ही शब्दशक्ती अनन्यसाधारण स्वरूपाची ठरते. युगांतरासाठी आसुसलेले व त्याकरिता काव्यकारण करणारे त्यांचे कविमन आजच्या मराठी काव्यसृष्टीमधील लोकविलक्षण दृश्य ठरते. मनोहरांची जीवनमूल्यात्मकता, त्यांची वैचारिकता, त्यांची चिंतनशीलता, त्यांची शब्दचापल्यता, त्यांची प्रतिमारंजकता मोठी मूल्यवेधक आहे. काव्यपातळीवरील युगांतराची भाववृत्ती व विचारवृत्ती किती उन्नत पातळीवर आविष्कृत होऊ शकते याचे मूर्तिमंत उदाहरण म्हणजे या कवीचा 'युगांतर' हा कवितासंग्रह होय. मात्र, आपण हेही कबूल केले पाहिजे, की युगांतराचा हा पेटलेला जाळ काव्यपातळीवरून व साहित्यरूपातून उफाळलेला जाळ आहे. प्रत्यक्ष युगांतर होण्याची प्रक्रिया, त्या युगांतराची विचारव्यवस्था, त्या युगांतराचे प्रत्यक्ष कृतिकार्यक्रम आणि त्यातून उत्क्रांत स्वरूपात होणारी युगांतरसिद्धी ही सर्वस्वी वेगळी बाब आहे. आणि ते झाले तर समस्त परिवर्तनवादी साहित्याची व साहित्यनिर्मिकांची ती शीर्षस्थ स्वप्नसिद्धी ठरेल. ह्या प्रत्यक्ष स्वरूपाच्या युगांतरासाठी मनोभूमिका तयार करू पाहणारा कवितासंग्रह या नात्याने 'युगांतर' या कवितासंग्रहाचे मोल लक्षणीय ठरते. समकालीन मराठी कवितेमध्ये मनोहर यांच्या 'युगांतर' या कवितासंग्रहाचे मोल लक्षणीय ठरते. समकालीन मराठी कवितेमध्ये मनोहर यांचा 'युगांतर' हा कवितासंग्रह त्यातील देदीप्यमान आशयाभिव्यक्तीमुळे अत्यंत महत्त्वाचा व निर्णायक स्वरूपाचा कवितासंग्रह ठरतो.

◆

**डॉ. शैलेंद्र लेंडे**
मराठी विभागप्रमुख,
रा. तु. म. नागपूर विद्यापीठ,
नागपूर ४४००३३
भ्रमणध्वनी- ७०३८७३१५३३
ई मेल- shailendra.rtmnu@gmail.com



अनुक्रमणिका





परीक्षण

संदेश ढगे

# कवितांनी भारलेली तिन्हीसांज

■ ■

**कधी सुनसान रात्री गुलमोहराची कथा सांगणाऱ्या मुलीची हळवी आठवण तो अस्वस्थपणे पेश करतो. कधी घोड्यांचा एक बेलगाम कळप पाठलाग करतोय, त्याचे जखमी चित्रण तो वाचकाच्या मनात कोरतो. वाचकाला घायाळ करत राहतो आणि अशा जीवघेण्या क्षणात कविता हाच त्याचा आधार होत राहतो. कविता फुल टाइम आणि जगणे पार्ट टाइम वाटावे इतका तो शब्दांशी जिव्हाळ्याने वागतो. एक उदास संध्याकाळ त्याच्या आयुष्यात रुंजी घालते. त्या संध्याकाळची चांदरात प्रसन्नपणे तो झेलतो आणि या सगळ्या प्रहाराचे गारुड वाचकाच्या हाती सोपवूनं तो शक्यतांचे कोंब कोमेजू नयेत म्हणून मायेने हाताची ओंजळ सावलीसाठी त्यावर धरतो.**

■ ■

कवितासंग्रह : सांगण्यासारखं
कवी : सतीश सोळांकूरकर
मुखपृष्ठ : संजय शेलार
प्रकाशक : संवेदना प्रकाशन, पुणे
मूल्य : १०० रु.
पृष्ठे : ८०

■ ■

कवी मग्न तळ्याकाठी अस्वस्थ येरझाऱ्या घालून शांत विसावला आहे. आपल्या स्मरणरंजनाचा एकेक दगड तो पाण्यावर भिरकावत आहे. त्यात उठणाऱ्या तरंगवलयांत तो भूतकाळातील एकेक आठवणीची उजळणी लख्खपणे वाचकाला समर्पित करतोय. कधी सुनसान रात्री गुलमोहराची कथा सांगणाऱ्या मुलीची हळवी आठवण तो अस्वस्थपणे पेश करतो. कधी घोड्यांचा एक बेलगाम कळप पाठलाग करतोय, त्याचे जखमी चित्रण तो वाचकाच्या मनात कोरतो. वाचकाला घायाळ करत राहतो आणि अशा जीवघेण्या क्षणात कविता हाच त्याचा आधार होत राहतो. कविता फुल टाइम आणि जगणे पार्ट टाइम वाटावे इतका तो शब्दांशी जिव्हाळ्याने वागतो. एक उदास संध्याकाळ त्याच्या आयुष्यात रुंजी घालते. त्या संध्याकाळची चांदरात प्रसन्नपणे तो झेलतो आणि या सगळ्या प्रहराचे गारूड वाचकाच्या हाती सोपवून तो शक्यतांचे कोंब कोमेजू नयेत म्हणून मायेने हाताची ओंजळ सावलीसाठी त्यावर धरतो. मग एक उधाणलेपण घेऊन वाचक त्याच्या कवितेतील पात्रे होत अस्वस्थ येरझाऱ्या घालत राहतात. कवी 'सांगण्यासारखं' आहे म्हणून सांगत नाही, तर सांगितल्याशिवाय राहवत नाही म्हणून या कवितांचे सत्पात्री दान मराठी सारस्वताला बहाल करतो.

कवी सतीश सोळांकूरकर यांचा 'सांगण्यासारखं' हा नवा कोरा चौथा कवितासंग्रह वाचतानाची अवस्था वर नमूद केल्याप्रमाणे एक प्रौढ कविता अनुभवल्याची प्रचिती देत आपल्याला आनंदयात्री करते. सोळांकूरकर हे त्यांच्या जगण्याच्या परिभाषेत आपल्याशी बोलत राहतात. एकाच वेळी स्वप्नोत्सव, अचंबा, चकवा, थेटपणा, गूढता, उत्सुकता यांनी ती भाषा सजलेली असते. कवीच्या नकळतपणे घडणाऱ्या या योगदानाइतके दुसरे सुंदर काही असू शकत नाही. कवितेची ताकद जशी आशयात आहे तशीच रेखीव भाषेत आहे.

*'तुझ्या दारात बांधून ठेवलेला घोडा*
*एकाएकी*
*कुठे तरी नियून गेल्याचे तू लिहिले आहेस'*

असे सांगताना कवी सभेवर अचंबित करणारे भाष्य लिहितो.–

*'आता मला चार पायांवर दुडकत*
*चालणे जमू लागले आहे.'*

अशा कवितेत कवी एक अनोखा संवादी पत्रशैलीचा फॉर्म वापरतो. 'रात्री अचानक जाग येते...' या कवितेत प्रियेशी संवाद करताना मृत्यूची ओढ

तो ठळक अधोरेखित करत जातो.

*आपणही झोपलेलो आहोत गाढ की जागे*
*आपल्यातूनच काही तरी निसटून जात असते मागे*

'अवेळी आलेला अज्ञात बुलावा' हे कवीने इतके गृहीत धरलेले आहे, की 'मृत्यू' हेच 'जिवंत' पात्र म्हणून त्याच्या कवितेत सळसळत राहते. कवीची ही ओढ वाचकाला भयसंदेश सुचवते.

*ज्यांची उद्या फुले व्हायची अशा कळ्या*
*अलगद पसरत असतात चंद्रकणांतून*

असे लिहून कवी उतारा शोधतो. नवा आशावाद ऊर्जेसारखा फुलवतो.

कवी स्वप्नांचा अर्थ लावताना अधिक ताकदीने स्वतःचे साम्राज्य उभे करतो. अशा स्वप्नमयी- मोहमयी निवडक कविता आपल्याला काटेरी वाटेवर बोट सोडून निघून जातात.

*शब्द होतील गुलमोहर त्यांना स्पर्श करून बघ*
*बर्फासारखे थंड तरी अर्थ लावून बघ*
*हळूच येतील जवळ दरीतून धुके यावे तसे*
*कुशीत घेतील अलगद आईने बाळाला घ्यावे तसे*

ही चित्रमयता सोळांकूरकर यांच्या कवितेचे वैशिष्ट्य मानावे लागेल. ते पुढे म्हणतात,

*'कधीतरी हा गच्च एकान्त हलवून बघ*
*माझे रेंगाळणे तुझ्यापाशी जरा अनुभवून बघ*

'उदास' ही कविता एका चाकरी करणाऱ्या विवाहित स्त्रीची घुसमट व्यक्त करते. दिनक्रमाच्या पाइपातील तिची सैरभैर धावपळ कवीने अतिशय संयमाने नोंदवली आहे आणि तिच्या आकांक्षेची सोबत निर्दयपणे सोडताना कवी खुलासेवजा शेवट करतो.-

*संध्याकाळी उदास वाट*
*तिला पुन्हा घराकडे ढकलत नेईल*
*वाट चुकलेला एक ढग मात्र*
*खिडकीपाशी कोसळत राहील*

इथे कविता संपते आणि वाचकाच्या मनात सुरू होते, हे या कवितेचे खरे यश आहे.

*तुझा पदर असायच्या अंगावर तर वाटायचे*
*अख्खा चंद्र पांघरून घेतला आहे सर्वांगावर*
*हे सांगताना कवी हळवा होत पुढे सांगतो.*
*एकेक गोष्ट मागे पडत गेली*
*वयाची डायरी हळूहळू भरत गेली*

ही वयाची डायरी कवीला अधिक प्रगल्भ करत राहते आणि वाचकाला समृद्ध. चारचौघांना सांगावेसे वाटले तरी कवीच्या जिंदगानीची ही शोकात्म विरूपिका आहे, ही खंत 'काहीच आठवत नाही'च्या अदृश्य सबबीखाली ठळकपणे उमटते.

*'तुझे दोन्ही हात हातांत घेऊन*
*सांगायची गोष्ट मात्र राहून गेली*
*तुझ्या डोळ्यांत डोळे घालून*
*रंगवायची स्वप्नेही वाहून गेली'*

स्वतःची वाट निर्विवाद सापडलेला हा कवी कधी स्वप्नांच्या माध्यमातून, तर कधी हरवलेल्या आणि हरलेल्या क्षणांनी आपला पिच्छा पुरवतो. आणि मराठी सारस्वताच्या पंगतीत मानाचे स्थान मिळतो.

◆


**संदेश ढगे**
डी-१०४, साई व्हिजन रेसिडेन्सी,
स्टेशन रोड, आसनगाव (पू.), तालुका शहापूर,
जि. ठाणे- ४२१ ६०१.
चलभाष : ९०२८९७८२८८







अनुक्रमणिका






लेख

प्रा. डॉ. सुहास पुजारी

# मराठी संतकवितेला कन्नड शरणधारेची भेट घडविणारी विदुषी डॉ. जयदेवीताई लिगाडे

**आत्मा परमात्म्याशी एकरूप होणे, ऐक्य पावणे हेच शाश्वत सत्य, या विचाराचे शास्त्रीय विवेचन 'शून्य संपादन' या ग्रंथात केले आहे.. अर्थात शिवयोग साधनेचा क्रम व त्याचे अंतिम ध्येय म्हणजे शून्यू-नि:शून्य प्राप्ती. कन्नड भाषेत यालाच 'बयलू', 'निर्बयलू' अशा संज्ञा आहेत. वीरशैव तत्त्वज्ञानाच्या आणि एकूणच आध्यात्मिक चिंतनाच्या क्षेत्रातील हा एक महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे. जयदेवीताईंनी हा ग्रंथ अनुवादून मराठी वैचारिक वाङ्मयास तर अधिक समृद्ध केलेच, शिवाय मराठी भक्तिसाहित्याचे दालनही अनेकांगांनी समृद्ध केले.**



डॉ. जयदेवीताई लिगाडे हे कन्नड साहित्यातील व मराठी-कन्नड सेतुबंधनातील एक महत्त्वाचे, अग्रणी नाव. कवयित्री, संपादक, अनुवादक, शरण वाङ्मयाच्या अभ्यासक आणि भाष्यकार म्हणून त्या कन्नड-मराठी द्विभाषकांना सुपरिचित आहेत. श्री सिद्धरामेश्वरांची सोलापूर ही जन्मभूमी. २३ जून १९१२ रोजी सोलापुरातील ऐतिहासिक वारसा म्हणून ओळखल्या जाणाऱ्या 'इंद्रभुवन' या देखण्या वास्तूत त्यांचा जन्म झाला.

'इंद्रभुवन' हे नगरशेठ अप्पासाहेब वारदांचे निवासस्थान. वारदांचे घर हे जयदेवीताईंचे आजोळ. अप्पासाहेब वारद हे त्यांचे आजोबा. जयदेवीताई त्यांच्या मानसकन्येची मुलगी. जयदेवीताईंच्या आईचे नाव संगव्वा (भागीरथी) तर वडिलांचे नाव चन्नबसप्पा असे होते. मडकी हे त्यांचे कुलनाम. जयदेवीताईंच्या मातु:श्री या सामाजिक कार्यात आस्था असणाऱ्या व धर्मनिष्ठ वृत्तीच्या होत्या. आपल्या राहत्या घरी त्यांनी स्त्रियांसाठी प्रौढ शिक्षणाचे वर्ग सुरू केले होते. त्यांना पोथ्या-पुराणांच्या वाचनाचा छंद होता. संस्कारशील वयात जयदेवीताईंच्या मनावरही तोच संस्कार झाला. शिक्षणाच्या आंतरिक ऊर्मीतून मराठी सहाव्या इयत्तेपर्यंतचे शिक्षण त्यांनी घेतले. आपल्या मातु:श्रींच्या सश्रद्ध वृत्तीच्या प्रभावामुळे त्यांचा शरणसाहित्याच्या पठणाचा व्यासंग वृद्धिंगत होत राहिला. पुढे त्या स्वत: प्रवचने देऊ लागल्या. १९२६ साली वयाच्या चौदाव्या वर्षी त्यांचे लग्न चन्नमल्लप्पा लिगाडे यांच्याशी झाले. लिगाडे कुटुंब प्रतिष्ठित, जुन्या वळणाचे, सनातनी होते, तरीही वाङ्मयाभिरुचीचा अंकुर त्यांच्या मनात वाढतच होता.

जयदेवीताईंची मातृभाषा कन्नड होती. त्यांचे शिक्षण मराठीत झाले होते. विवाहित झाल्यानंतर तीन मुलांच्या प्राप्तीनंतर त्यांनी घरीच कन्नड भाषेचे शिक्षण घेतले. कन्नड भाषा आत्मसात केल्यानंतर घरातल्यांना त्या कन्नड ग्रंथांचे निरूपण करीत असत. केवळ शरणसाहित्याच्या वाचनओढीतून त्यांनी कन्नड भाषा

आत्मसात केली. अकाली वैधव्य येऊनदेखील शरणसाहित्याच्या व द्विभाषा अभ्यासाच्या आराधनेतून कन्नड आणि मराठी अशा दोन्ही भाषांत त्यांनी विपुल साहित्यनिर्मिती केली.

जयदेवीताईंनी कन्नड भाषेतील सात व मराठी भाषेतील दहा अशा एकूण सतरा ग्रंथांची निर्मिती केली. 'जयगीता', 'तारक तंबुरी', 'ताईय पदगळू', 'बंदेऊ कल्याणक', 'अरविंन आळदिंद', 'श्री सिद्धरामेश्वर पुराण', 'साविरद पदगळू' (संपा. बी.एस. स्वामी), ही त्यांची कन्नड ग्रंथसंपदा. 'जयगीता' हा त्यांचा पहिला संग्रह १९५२ साली प्रकाशित झाला. तो चौदा भाषांत अनुवादित झाला. 'अरविंन आगरदल्ली' हा जयदेवीताइंच्या सात हजार त्रिपदींचा संग्रह त्यांच्या पश्चात डॉ. सा. सि मरुळय्या यांनी १९९० साली संपादित केला. नावाप्रमाणेच तो ज्ञानाचा खजिनाच आहे. 'सिद्धवाणी' (१९५३), 'बसवदर्शन' (१९५४), 'महायोगिनी' (१९५५), 'सिद्धलिंगवाणी'(१९७२) हे चार ग्रंथ म्हणजे श्रीसिद्धरामेश्वर, श्रीबसवेश्वर आणि अक्कमहांदेवी व श्रीसिद्धलिंगेश्वर कवींच्या काही कन्नड वचनांचा त्यांनी केलेला मराठी अनुवाद आहे. याखेरीज 'अण्णबसवण्णा', 'समृद्ध कर्नाटकाची रूपरेषा', 'शून्य संपादन' आदी त्यांनी निर्मिलेले मराठी ग्रंथही महत्त्वाचे आहेत. डॉ. भगवानदास तिवारी यांच्या 'महावीर वाणी' या हिंदी ग्रंथाचा मराठी अनुवादही त्यांनी केला आहे.

जयदेवीताईंचे पुष्कळसे लेखन हे शिवयोगी श्रीसिद्धरामांशी संबंधित आहे. शिवशरणांचा व त्यांच्या वचनवाङ्मयाचा– त्यातही श्रीसिद्धरामांच्या जीवनाचा आणि वचनांचा प्रभाव त्यांच्या समग्र जीवनावर पडलेला दिसतो. 'श्रीसिद्धरामांची त्रिविधी' हा कन्नड ग्रंथ त्यांनी मराठीत अनुवादिला आहे. श्री सिद्धरामांनी बसव स्तोत्र त्रिविधी, मिश्र स्तोत्र त्रिविधी व अष्टावर्ण स्तोत्र त्रिविधी अशा त्रिविधी कन्नडमध्ये रचल्या आहेत. हा ग्रंथ कन्नड भाषेतही मुद्रित झाला नव्हता. श्री चन्नप्पा उत्तंगी यांच्याकडून तो संपादित करून घेऊन आपल्या कन्नड कोटी प्रकाशनाकडून तो त्यांनी प्रकाशित केला. तो ग्रंथ मराठीत यावा म्हणून त्यांनी त्याचा स्वत: अनुवाद केला. श्री सिद्धरामांनी 'योगिनाथ' अशी नाममुद्रा घेऊन लिहिलेल्या या त्रिविधींचा अनुवाद करून व त्याला प्रस्तावना जोडून या ग्रंथाचा त्यांनी मराठी भाषकांना आणि भाविकांना परिचय घडवला.

'श्रीसिद्धरामेश्वर पुराण' नावाचे शिवयोगी श्रीसिद्धरामेश्वरांचे चरित्र त्यांनी लिहिले. एक्केचाळीस अध्यायांत व चार हजार एकशे छपन्न त्रिपदींमध्ये रचलेले हे काव्य कर्नाटक रसिकांनी मस्तकी धरिले. मंगलाचरणाच्या सत्तावीस व उपसंहारातील एकोणतीस त्रिपदींचाही यात समावेश आहे. एकोणिसाव्या अध्यायात तीन नयन्नेपद अर्थात तैलाभिषेकाची पदे व एकविसाव्या अध्यायात एक भजनही आहे. 'श्रीसिद्धरामेश्वर पुराणा'त शिवयोगी श्रीसिद्धरामांचे चरित्र व त्यांचे गुणगान अतिशय रसाळ व ओघवत्या लोकभाषेच्या शैलीत केले आहे. श्री सिद्धरामांविषयीच्या भक्तीने हे काव्य भिजले आहे. परिणामी, श्रीसिद्धरामांवर व शरणसाहित्यावर प्रेम करणाऱ्यांसाठी ते केवळ वंदनीयच ठरले असे नाही, तर कन्नड भाषेतील महाकाव्य म्हणून ते प्रशंसिले गेले आहे. या ग्रंथाचा गौरव म्हणून कन्नड साहित्यप्रेमींनी १९६९ साली हुबळी येथे 'श्रीसिद्धरामेश्वर पुराणा'ची पालखीतून मिरवणूक काढली. वस्तुत: जयदेवीताईंची पालखीतून मिरवणूक काढण्याची तयारी रसिकांनी चालवली होती, परंतु जयदेवीताईंनी त्याला स्पष्ट नकार दिला. मिरवणूकच काढायची असेल तर ग्रंथाची मिरवणूक काढा, अशी सूचना त्यांनी केली. त्यातून 'श्रीसिद्धरामेश्वर पुराणा'ची मिरवणूक काढण्यात आली. विभूतिपूजनापेक्षा ग्रंथसन्मान त्यांनी महत्त्वाचा मानले. समाजाचे सुख असणाऱ्या ग्रंथांचा जयजयकार झाला पाहिजे, जीवनाचा आधार असणाऱ्या ग्रंथाची ओळख समाजाला झाली पाहिजे, ही भावना त्यामागे होती. या ग्रंथाने जयदेवीताईंना कन्नड साहित्यजगतात मानाचे स्थान मिळवून दिले. पुढे १९७६ साली कर्नाटक विद्यापीठाने या ग्रंथकर्तृत्वाची दखल घेत त्रिपदीतील, जानपद शैलीतील या काव्यग्रंथाकरिता डी. लिट. ही सन्माननीय पदवी देऊन त्यांचा गौरव केला.

शिवगण प्रसादी महादेव विरचित 'शून्य संपादने' या कन्नड ग्रंथाचा मराठी अनुवाद व संपादन जयदेवीताई लिगाडे यांनी केले आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने हा ग्रंथ प्रकाशित केला आहे. कल्याण येथील अनुभव मंटपातील शिवशरणांच्या तत्त्वचर्चेवरील तो ग्रंथ आहे. इ.स.१४१९ ते १५१९ या काळात पाच निरनिराळ्या ग्रंथकर्त्यांकडून यावर पाच कृतींची रचना झाली. कर्नाटक विद्यापीठाकडून हा ग्रंथ सहा खंडांत प्रकाशित झाला आहे. 'शून्य संपादन' या नावाने ही ग्रंथनिर्मिती सर्वज्ञात आहे. या ग्रंथाचे आद्य संकलनकार म्हणून शिवगण प्रसादी महादेव हे ओळखले जातात. म्हैसूर विद्यापीठाचे डॉ. एल. बसवराज व कर्नाटक विद्यापीठाचे डॉ. आर. सी. हिरेमठ यांनी स्वतंत्रपणे संपादिलेल्या दोन कन्नड ग्रंथांचा आधार घेऊन जयदेवीताईंनी

या ग्रंथाचा मराठी अनुवाद केला आहे. या मराठी अनुवादाकरिता त्यांचे नाव महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास सुचविले होते ते कन्नड महाकवी द. रा. बेंद्रे यांनी. जयदेवीताईंनी हा अनुवाद करताना शिवशरणांच्या तत्त्वज्ञानाला व मूळ ग्रंथकाराच्या भूमिकेस अनुसरून हा ग्रंथ सिद्ध केला आहे. वचन वाङ्मयाचा छंद मराठी साहित्यातही रुजावा, त्यातील विचार व भावमयता यासह लालित्य व गेयतादेखील मराठी साहित्यात अवतरावी, या भूमिकेतून हा अनुवाद त्यांनी सिद्ध केला आहे. त्यामुळे तो अभ्यासपूर्ण आणि मूळ ग्रंथाला वाचकांपर्यंत पोचवण्यात यशस्वी ठरला आहे. दोन राज्यांतून वाहणाऱ्या नद्यांच्या पाण्यावरून सर्वत्र राजकीय वितंडवाद होत असलेले आपणास पाहायला मिळतात; परंतु दोन राज्यांच्या भाषांतून वाहणाऱ्या साहित्यगंगेचे प्रयागतीर्थ सर्वांना अनुभवास यावे म्हणून श्रेष्ठ वचनांचे संकलन 'शून्य संपादन' ग्रंथात संग्रहित झाले आहे. चन्नबसवेश्वर, मुक्तायक्का, अक्कमहादेवी, अक्क नागम्मा, धोबी माचय्या, डोहार कक्कया, न्हावी अप्पणा आदी शरणांच्या तत्त्वचिंतनाची चर्चा या 'शून्य संपादन' ग्रंथात ग्रथित झाली आहे, याची नोंदही जयदेवीताईंनी प्रस्तावनेत केली आहे. जयदेवीताईंनी या ग्रंथास लिहिलेली प्रस्तावना अभ्यासपूर्ण आहे. अनेकविध विचारांचा परामर्श त्यांनी यात घेतला आहे. शरणसाहित्याचा सूक्ष्म धांडोळा घेताना त्यांनी काही महत्त्वाच्या विचारसूत्रांकडे वाचकांचे अवधान खेचले आहे. या दृष्टीने शरण वाङ्मयासंबंधीचा त्यांचा विचार लक्षणीय आहे. बाराव्या शतकाच्या अखेरीस भारताच्या ईशान्येकडून होणाऱ्या आक्रमकांच्या शिरकावाची चाहूल शिवशरणांना लागली होती व त्याचा प्रतिकार करण्याची सिद्धता त्यांनी चालवली होती. स्वदेश व स्वधर्माच्या



**जयदेवीताईंच्या जीवनाला अनेक लखलखीत कडा होत्या. साहित्य, धर्मकारण, अध्यात्म, समाजकारण, राजकारण अशा जीवनाच्या विविध क्षेत्रांत त्या सक्रिय होत्या. त्यांना संगीताचीही उत्तम जाण होती. त्या उत्तम गायन करीत. त्यांनी आपल्या अनेक पदांना संगीतबद्ध केले होते.**

सारस्वतांची सर्व शक्ती पणाला कशी लागत असते याचे एक उत्तम उदाहरण म्हणून जयदेवीताईंच्या या कार्याकडे पाहता येईल. जयदेवीताई या मराठी-कन्नड भाषकांमधील स्नेहवर्धनाच्या दुवा होत्या.

शिवगण प्रसादी महादेव विरचित 'शून्य संपादन' ग्रंथात एकूण ९५९ वचनांचा समावेश आहे. या चर्चेत एकूण तेरा शिवशरण व तीन शिवशरणींचा सहभाग आहे. यात अल्लमप्रभुदेवांचीच ३५० हून अधिक वचने आहेत, त्यामुळे हा ग्रंथ 'प्रभुदेवांचे शून्य संपादन' म्हणूनही ओळखला जातो. जयदेवीताईंनी या ग्रंथाच्या संपादन आणि अनुवादाच्या निमित्ताने 'संकलन साहित्या'संबंधीचा एक महत्त्वाचा विचार नोंदविला आहे व त्याचे महत्त्वही अधोरेखित केले आहे. वेद- वाङ्मय काय किंवा प्लेटोची प्रवचने काय, हे सर्व संकलनातून उभे राहिले आहे. विविध संप्रदायांतील ज्ञानी, द्रष्ट्या पुरुषांचे, तपस्व्यांचे तत्त्वचिंतन संकलित होऊन त्या त्या धर्मपंथांचे पवित्र ग्रंथ निर्माण झाले आहेत, शिवशरण अशा ग्रंथांना अपौरुषेय मानीत नाहीत, हा विचार या अनुषंगाने त्या मांडतात.

दिव्य पुरुषांच्या दिव्य स्वानुभवातून स्फुरलेल्या रक्षणासाठी गणाचार तत्त्वाचे सूत्र त्यांनी अंगीकारले होते, याकडे जयदेवीताई लक्ष वेधतात.

शिवशरणांच्या क्रांतिकारक नवविचारांचा मागोवाही त्यांनी यात घेतला आहे. बहुदेवता उपासनेचे खंडन करून शिवशरणांनी बसवधर्माला अनुसरून एकेश्वरवादाचा पुरस्कार केला. शिक्षणाची गंगा त्यांनी सर्वांच्या दारात पोचवली. संस्कृत ज्ञानभांडार त्यांनी लोकभाषेत आणले. ज्ञानामृताने त्यांनी जनसामान्यांत आत्मविश्वास जागविला. स्त्री-पुरुष समानतेचा विचार त्यांनी पुरस्कारिला. स्त्रियांनादेखील भक्तीचे क्षेत्र खुले असून, त्यादेखील मोक्षाच्या अधिकारी आहेत, या मताचा पुरस्कार करून त्यांच्या मुठीत विश्वास भरला. त्याचेच फलित म्हणून अनुभव मंटपात सहभागी होऊन स्त्रियांनी-शिवशरणींनी अनुभवसिद्ध वचने लिहिली. ही क्रांती अनुभव मंटपाने घडवून आणली. म. बसवेश्वरांच्या विचारांनी हा चमत्कार करून दाखवला, याकडे त्या लक्ष वेधतात. अनुभव मंटपातील ६० शरणींनी वचने लिहिली असल्याचा उल्लेख आहे, पण आतापर्यंत केवळ २७ शरणींचीच वचनसंपदा उपलब्ध झाली आहे, याचीही नोंद त्यांनी केली आहे.



अनुक्रमणिका



**जयदेवीताईंच्या आयुष्यात मानसन्मानाचे अनेक क्षण आले. वयाच्या बाविसाव्या वर्षी कन्नड वीरशैव साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. म्हैसूर राज्य साहित्य व ललित कला अकादमीच्या वतीने १९६८ साली त्यांच्या वाङ्मयीन कामगिरीबद्दल त्यांना गौरवपत्र प्रदान करण्यात आले. त्यांच्या षष्ट्यब्दीपूर्तीनिमित्त जयदेवी गौरवग्रंथ प्रकाशित झाला. १९७४ साली मंडया येथे झालेल्या अखिल भारतीय कन्नड साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा बहुमान त्यांना लाभला. महाराष्ट्रस्थित कन्नड सारस्वतास मिळालेला हा सन्मान आहे.**

आत्मा परमात्म्याशी एकरूप होणे, ऐक्य पावणे हेच शाश्वत सत्य, या विचाराचे शास्त्रीय विवेचन 'शून्य संपादन' या ग्रंथात केले आहे. अर्थात शिवयोग साधनेचा क्रम व त्याचे अंतिम ध्येय म्हणजे शून्यू-नि:शून्य प्राप्ती. कन्नड भाषेत यालाच 'बयलू', 'निर्बयलू' अशा संज्ञा आहेत. वीरशैव तत्त्वज्ञानाच्या आणि एकूणच आध्यात्मिक चिंतनाच्या क्षेत्रातील हा एक महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे. जयदेवीताईंनी हा ग्रंथ अनुवादून मराठी वैचारिक वाङ्मयास तर अधिक समृद्ध केलेच, शिवाय मराठी भक्तिसाहित्याचे दालनही अनेकांगांनी समृद्ध केले.

आद्य शंकराचार्यांनी प्रतिपादिलेला अद्वैतवाद 'ब्रह्मसत्यजगन्मिथ्य:' हे सूत्र समोर ठेवतो, तर शिवाद्वैत आद्य किंवा काश्मीर शैव सिद्धांत हा जग मिथ्या आहे असे मानीत नाही. महात्मा बसवेश्वरांनी प्रवर्तिलेला लिंगायत अथवा वीरशैव धर्मदेखील जग मिथ्या आहे असे मानीत नाही. तो एकेश्वरवाद सांगतो. चौदा भुवनांची कल्पना त्यास मान्य नाही. सदाचारात स्वर्ग तर अनाचारात नरक आहे, हे या धर्माचे प्रतिपादन आहे. म. बसवेश्वरांनी कार्यकर्तृत्वाची शिकवण दिली होती. 'कायकवे कैलास' हे ब्रीद त्यांनी शिवशरणांच्या सर्वसामान्य लोकांच्या मनीमानसी उतरवले होते. लहान असो अथवा थोर, सामान्य असो अथवा उच्चपदस्थ, प्रत्येकाने दररोज काही तरी शारीरिक कष्ट केलेच पाहिजेत, अशी त्यांनी लोकजीवनाला श्रमप्रतिष्ठेची शिस्त लावली. अशी म. बसवेश्वरांच्या तत्त्वज्ञानाची आणि कार्याची ओळख त्यांनी मराठी वाचकांना करून दिली आहे.

जयदेवीताई यांना त्रिपदी छंदातील रचना विशेष प्रिय होती. कन्नडमधील हा छंद त्यांनी मराठीत आणला. मराठी रसिकांना या छंदाचा परिचय करून देण्याचे व गोडी लावण्याचे श्रेय त्यांच्याकडे जाते. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार या विद्वानांनीही त्यांच्या या कार्याची प्रशंसा केली आहे. जयदेवीताईंनी आपले पुष्कळसे साहित्य या छंदात निर्माण केले. आध्यात्मिक, पारलौकिक अनुभव तर त्यांनी त्रिपदीतून प्रतिपादिला आहेच, पण त्याबरोबरच आपल्या लौकिक अनुभव-आठवणीही त्यांनी त्रिपदी छंदात कथिल्या आहेत. आपली नात श्रीसिद्धरामेश्वरांच्या तलावात पडल्यानंतरचा अनुभवदेखील त्यांनी याच छंदात शब्दबद्ध केला आहे. 'साविरद पदगळू' या संग्रहात त्यांचा त्रिपदीबद्ध स्वानुभव ग्रथित झाला आहे. डॉ. सरोजिनी चौलार यांनी पीएच.डी.च्या निमित्ताने जयदेवीताईंच्या समग्र साहित्याचा अभ्यास केला आहे.

जयदेवीताईंच्या जीवनाला अनेक लखलखीत कडा होत्या. साहित्य, धर्मकारण, अध्यात्म, समाजकारण, राजकारण अशा जीवनाच्या विविध क्षेत्रांत त्या सक्रिय होत्या. त्यांना संगीताचीही उत्तम जाण होती. त्या उत्तम गायन करीत. त्यांनी आपल्या अनेक पदांना संगीतबद्ध केले होते.

वयाच्या अठराव्या वर्षापासून त्यांच्या जीवनावर गांधीविचारांचा प्रभाव पडला. गांधीजींच्या आचार-विचारांवर त्यांची दृढ श्रद्धा होती. गांधीजींना त्या शरणच-संतच मानत असत. त्यातून व आपल्या मातु:श्रींच्या कार्यातून प्रेरणा घेऊन त्यांनी १९४७ साली प्रौढ शाळेची स्थापना केली. १९५० साली भगिनी मंडळाची स्थापना केली. भाषावार प्रांत रचनेच्या पार्श्वभूमीवर कर्नाटक चळवळीत त्यांनी सक्रिय योगदान दिले. कामगारांच्या शिक्षणासाठी विशेष प्रयत्न केले. डॉ. मोदी यांच्या सहकार्याने नेत्रशिबिरे घेऊन विचारांप्रमाणेच सर्वसामान्यांची दृष्टी सुधारण्याच्या कार्यातही त्यांनी पुढाकार घेतला. सर्वसामान्यांची सुख-दु:खे समजून घेणारी संवेदनशीलता त्यांच्याकडे होती. त्या भूमिकेतून ते आईच्या ममतेने विचारपूस करीत, गरजवंताला मदत करीत.

हैद्राबाद स्वातंत्र्य संग्रामाच्या लढ्याच्या काळात रझाकारांच्या अत्याचाराने पीडित होऊन शेकडोंच्या संख्येने विस्थापित, निर्वासित झालेल्यांना त्यांनी सोलापुरात आश्रय दिला. स्वत:च्या शेतातील उभे पीक कापून काढून त्यांनी तेथे या पीडितांसाठी तंबू उभारला. दीर्घकाळ तेथे राहण्याची



अनुक्रमणिका

सोय केली. त्यांच्या अन्न-पाणी-वस्त्र-निवाऱ्याची व्यवस्था केली. गर्भवती स्त्रियांची बाळंतपणे केली. त्यांच्या औषधपाण्याची तजवीज केली. हे सर्व त्यांनी देशप्रेमाच्या व मानवतेच्या विशाल, उदार भूमिकेतून केले. 'जिकडे जावे तिकडे माझी भावंडे आहेत' हीच त्यामागे त्यांची भूमिका होती. भारताच्या स्वातंत्र्य चळवळीला साहाय्यभूत ठरेल असे कार्य जयदेवीताईंनी निष्ठेने केले. गांधीहत्येनंतर सोलापुरात त्यांनी शोकसभा आयोजित केली आणि हत्येनंतर उसळलेल्या दंगली थांबाव्यात व शांतता प्रस्थापित व्हावी यासाठी सभा घेतल्या व सर्वतोपरी प्रयत्न केले.

जयदेवीताईंची राष्ट्रनिष्ठा कशी जाज्वल्य होती त्याचे एक उदाहरण खूप बोलके आहे. दुसरे महायुद्ध चालू होते तेव्हाची ही गोष्ट. ब्रिटिशांची 'लिंगायत बटालियन' निर्माण करण्याची तयारी सुरू होती. तेव्हा जयदेवीताईंना समाजात मोठे आदराचे स्थान होते. त्यामुळे जयदेवीताईंनी लिंगायत तरुणांना सैन्यात भरती व्हावे यासाठी प्रोत्साहित करावे म्हणून ब्रिटिश अधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे आग्रह धरला; परंतु ब्रिटिश सैन्यात भरती होण्यास आपण तरुणांना कोणत्याही परिस्थितीत सांगणार नाही, तसे केल्यास तो देशद्रोह होईल, अशा शब्दांत त्यांनी या कार्यास ठामपणे नकार दिला. यासाठी ब्रिटिशांनी 'कैसर-ए-हिन्द' हा किताब देण्याचे आमिषही त्यांना दाखवले; परंतु त्यांनी त्याला भीक घातली नाही. अशी प्रखर देशभक्ती त्यांच्या हृदयी वास करीत होती. स्वदेश, स्वभाषा, स्वधर्म यांप्रति त्यांची निष्ठा उत्कट होती.

जयदेवीताईंच्या आयुष्यात मानसन्मानाचे अनेक क्षण आले. वयाच्या बाविसाव्या वर्षी कन्नड वीरशैव साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले. म्हैसूर राज्य साहित्य व ललित कला अकादमीच्या वतीने १९६८ साली त्यांच्या वाङ्मयीन कामगिरीबद्दल त्यांना गौरवपत्र प्रदान करण्यात आले. त्यांच्या षष्ट्यब्दीपूर्तीनिमित्त जयदेवी गौरवग्रंथ प्रकाशित झाला. १९७४ साली मंडया येथे झालेल्या अखिल भारतीय कन्नड साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा बहुमान त्यांना लाभला. महाराष्ट्रस्थित कन्नड सारस्वतास मिळालेला हा सन्मान आहे.

आयुष्यातील शेवटचा श्वास हा शरणांच्या सान्निध्यात, शरणस्थळी घ्यावा, या इच्छेपोटी अखेरचा काळ त्यांनी बसवकल्याण येथे व्यतीत केला. 'बंदेऊ कल्याणक' (आले कल्याणला) (१९८२) या कवितांची रचना त्यांनी या काळात केली. वीरशैव महिला ज्ञान मंदिराची स्थापना करून त्यांनी प्रवचने दिली. प्रबोधनाचे कार्य केले. शरण आणि शरणसाहित्याच्या संदर्भात त्या कार्यरत राहिल्या. 'श्रीसिद्धरामेश्वर पुराणा'प्रमाणेच श्रीबसवेश्वर पुराणा'ची रचना करण्याचा त्यांचा मानस होता; परंतु त्यामागे परमेश्वराची इच्छा उभी नव्हती हेच खरे. प्रकृती खालावल्यावर त्यांना सोलापुरातील श्रीछत्रपती शिवाजी महाराज सर्वोपचार रुग्णालयात (सिव्हिल) दाखल केले होते. अखेर २५ जुलै १९८६ रोजी सोलापूर येथील रुग्णालयात त्यांनी आपली इहयात्रा पूर्ण केली. अंतिम इच्छा म्हणून त्यांनी स्वत: वीरशैव तत्त्वज्ञानास अनुसरून बसवकल्याण येथील भक्तिभवन येथे षट्कोनाकृती समाधिस्थळ बांधण्याची सूचना केली होती. त्यांच्या इच्छेनुसार बसवकल्याण येथे त्यांचा देह विसावला.

◆

प्रा. डॉ. सुहास पुजारी
'अक्षरपान', ७/८, मंत्री चंडक इस्टेट,
किल्लेदार सांस्कृतिक भवनाजवळ,
होटगी रस्ता परिसर, सोलापूर, ४१३००३
चलभाष -९९६०२७२०३१,
ई-मेल - suhaspujari18@gmail.com





अनुक्रमणिका



लेख

माधव राजगुरू

# लेखनात विरामचिन्हे हवीतच

विरामचिन्हे ही भाषेची अविभाज्य अंगे आहेत. ती केवळ शोभेसाठी नाहीत. लोकांच्या मनातील विरामचिन्हांच्या वापरासंबंधीची अनास्था संपावी, लेखनातील त्यांची अनिवार्यता कळावी आणि त्यांचा वापर वाढावा, याच हेतूने हा लेख लिहिला आहे.



व्यवहारसुकरता आणि भावनिक गरज यातून भाषेचा जन्म झाला. कालांतराने लिपीचा शोध लागला. मौखिक स्वरूपात व्यक्त होणारी भाषा लिपीच्या माध्यमातून कागदावर उमटू लागली. वेळ-प्रसंगानुरूप मनात येणाऱ्या भावभावना, विचार जतन करून ठेवणे लिपीमुळे शक्य झाले; परंतु जे भाव बोलताना आपल्या मनात असतात ते प्रत्यक्ष ऐकणाऱ्यांना लक्षात येतात. तेच भाव लिहिलेले वाचतानासुद्धा लक्षात यावेत यासाठी 'विरामचिन्हे' आपणास मदत करतात. लिपीचा शोध लागल्यानंतर प्रारंभीच्या काळात 'विरामचिन्हे' नव्हती. ब्रिटिशांच्या राजवटीत इंग्रजी भाषा आपल्या देशात इतकी रुजली की त्या भाषेतील अनेक गोष्टी आपण उचलल्या. 'विरामचिन्हे' ही इंग्रजीचीच देणगी आहे; परंतु या विरामचिन्हांचे महत्त्व आपल्याकडे अजूनही पूर्णतः समजलेले नाही. लोकांत विरामचिन्हांच्या वापराबाबत कमालीची अनास्था दिसते. अनेकांना ही विरामचिन्हे माहीतच नसतात, त्यामुळे ते वापरत नाहीत. काहींना कोणते विरामचिन्ह कोठे वापरावे याचे ज्ञान नसल्यामुळे ते ती वापरत नाहीत, वापरली तरी चुकीच्या ठिकाणी वापरतात. काहींना तर अनेक विरामचिन्हांची नावेही माहीत नाहीत. ही गोंधळाची स्थिती पाहता विरामचिन्हांच्या वापरासंबंधीची मोहीम हाती घेण्याची गरज निर्माण झाली आहे.

विरामचिन्हे शोभेसाठी नसून प्रत्येक विरामचिन्हाला वेगळा अर्थ आहे आणि तो अर्थ, भाषेतील त्याचे कार्य आणि महत्त्व या गोष्टी समजून घेतल्या तरच त्यांचा लेखनात योग्य वापर होऊ शकेल.

भाषा म्हणजे चिन्हांचा समुच्चयच आहे. अनेक चिन्हांच्या समुच्चयातून लिखित भाषा आकाराला येते. यामध्ये विरामचिन्हांचा एक समूह आहे. पूर्णविराम, अर्धविराम, स्वल्पविराम, अपूर्णविराम, प्रश्नचिन्ह, उद्गारचिन्ह, अवतरण, संयोगचिन्ह, अपसरणचिन्ह, लोपचिन्ह, विकल्पचिन्ह, काकपद, अवग्रह, संदर्भ, कंस, दंड ही सर्व विरामचिन्हे आहेत. निवडक विरामचिन्हांची माहिती पुढे दिली आहे.

**(१) पूर्णविराम (.)**

बोलताना वाक्य पूर्ण झाले की आपण पुढील वाक्य बोलण्याआधी काही सेकंद थांबतो. लिहिताना वाक्य पूर्ण झाले आहे, हे कळण्यासाठी

आपण पूर्णविराम देतो. पूर्णविराम न देता लेखन केल्यास वाक्य कोठे संपते आणि नवीन वाक्याची सुरुवात कोठे होते हे चटकन लक्षात येत नाही. वाक्य पूर्ण झाल्याचे सूचित करणे हे पूर्णविरामाचे पहिले कार्य आहे. घाईत लिहिताना पूर्णविराम देण्याचे राहून जाते किंवा अनवधानाने पूर्णविराम चुकीच्या ठिकाणी दिला जातो. अशा वेळी अर्थाचा अनर्थ होतो. उदाहरणार्थ, मी चोरी करणार नाही. केल्यास शिक्षा करावी. याच वाक्यातील पूर्णविरामाची जागा बदलून पाहू या. मी चोरी करणार. नाही केल्यास शिक्षा करावी. वाक्ये तीच; पण पूर्णविरामाची जागा बदलली, त्यामुळे वाक्यातून ध्वनित होणारा अर्थ पूर्णपणे बदलला.

पूर्णविरामाचे दुसरे एक कार्य आहे. नामाचा संक्षेप करण्यासाठीसुद्धा याच चिन्हाचा वापर केला जातो. उदाहरणार्थ, विष्णू सखाराम खांडेकर हे नाव संक्षेपाने लिहिण्यासाठी नावाच्या आद्याक्षरांसमोर पूर्णविराम देऊन लिहिले जाते. जसे- वि. स. खांडेकर.

### (२) स्वल्पविराम (,)

बोलताना वाक्य पूर्ण झाले की काही सेकंद थांबून आपण पुढचे वाक्य बोलतो. अनेकदा वाक्याच्या मध्येसुद्धा काही ठिकाणी अल्पवेळ थांबणे आवश्यक असते. वाक्यात एकाच स्वरूपाचे शब्द क्रमाने येतात तेव्हा प्रत्येक शब्द उच्चारताना अल्प काळ थांबावे लागते. अशा प्रत्येक शब्दानंतर स्वल्पविराम द्यायचा असतो. उदाहरणार्थ, माझ्याकडे लाल, निळे, पिवळे, काळे आणि पांढरे अशा अनेक रंगांचे पेन आहेत. कधी कधी दोन वाक्यांचे मिळून एक वाक्य बनते, तेव्हा पहिल्या वाक्याच्या शेवटी 'स्वल्पविराम' देणे आवश्यक असते. उदाहरणार्थ, मी उत्तमप्रकारे गाऊ शकतो, हे मला शेवटपर्यंत कळलेच नाही. या वाक्यातील 'गाऊ शकतो' या क्रियापदामुळे इथे वाक्य पूर्ण झाले असे वाटते; परंतु वाक्य 'कळलेच नाही' येथे पूर्ण होत असल्यामुळे 'शकतो' या क्रियापदानंतर स्वल्पविराम द्यायला हवा. व्यक्तीला हाक मारताना संबोधनानंतर (नावापुढे) स्वल्पविराम देऊन लिहिले जाते. जसे- गार्गी, जेवायला ये.

काही वेळा व्यक्तींच्या नावापुढे त्यांचे पद आणि संस्थेचे नाव लिहिताना स्वल्पविराम चिन्ह वापरतात. जसे- नयना राजे, संचालक, शब्दरंग प्रतिष्ठान, पुणे.

पत्ता लिहितानासुद्धा या चिन्हाचा वापर केला जातो. जसे- महेश पॅराडाईज, ए-२/१५, औंध, पुणे ७.

### (३) प्रश्नचिन्ह (?)

प्रश्नार्थक वाक्याच्या शेवटी हे चिन्ह येते. वाक्यात कोण, काय, कसे, कोठे, किती यांसारख्या शब्दांच्या साह्याने प्रश्न विचारले जातात. काही वेळा वाक्यात कोण, काय, कसे इत्यादी प्रश्नार्थक शब्द असूनसुद्धा वाक्यात कोठेही प्रश्नचिन्ह वापरण्याची गरज नसते. पुढील वाक्य वाचा. माझ्या हातात काय आहे? या वाक्यात सरळ सरळ प्रश्न विचारला आहे, म्हणून वाक्याच्या शेवटी प्रश्नचिन्ह लिहिले आहे. आता हे दुसरे वाक्य वाचा. माझ्या हातात काय आहे हे तू ओळख. या वाक्यातील पहिला भाग प्रश्नार्थक आहे असे वाटते; पण पूर्ण वाक्य प्रश्नार्थक नाही. 'काय आहे'च्या पुढे 'हेतू ओळख' असे विधान आहे; म्हणून या वाक्याच्या शेवटी वा पहिल्या वाक्याच्या शेवटी प्रश्नचिन्ह लिहिण्याची गरज नाही. यांसारखी आणखी उदाहरणे पाहा.

'कोण, किती पाण्यात आहे हे मी ओळखून आहे.'

'आत्ता तू कोठून आलास', हे मला सांगण्याची गरज नाही.

### (४) अर्धविराम(;)

पहिल्या वाक्यावर दुसरे वाक्य अवलंबून असते किंवा पहिल्या वाक्यातील आशयाशी संबंधित आशय दुसऱ्या वाक्यात येतो, अशा वेळी ही दोन्ही वाक्ये पण, परंतु, म्हणून अशा उभयान्वयी अव्ययांनी जोडली जातात. दोन्ही वाक्ये उभयान्वयी अव्ययाने जोडताना पहिल्या वाक्याच्या शेवटी पूर्णविराम न देता अर्धविराम द्यावा. उदाहरणार्थ, (१) मी अभ्यास केला नव्हता; म्हणून नापास झालो. हेच वाक्य असेही लिहिता येईल- मी नापास झालो; कारण मी अभ्यास केला नव्हता. (२) हे शहर खूप चांगले आहे; परंतु इथली माणसे लबाड आहेत.

### ५) अवतरण ('...') (''...'')

लेखनात अवतरणांचा वापर अत्यंत ढिसाळ पद्धतीने होताना दिसतो. एकेरी अवतरण, दुहेरी अवतरण असे अवतरणाचे दोन प्रकार आहेत. दुहेरी अवतरण फक्त

संवादामध्ये वापरले जाते. ती म्हणाली किंवा तो म्हणाला, अशा विधानांपुढे जो मजकूर येतो तो दुहेरी अवतरणात लिहावा. संवाद, संभाषण, बोलणे जेथे सुरू होते, तेथे अवतरण देऊन, जेथे बोलणे संपते तेथे अवतरण पूर्ण करावे. बोलणे संपते तेथे अवतरण पूर्ण न केल्यास संबंधिताचे बोलणे कोठे संपले किंवा नवीन संभाषण कोठे सुरू झाले हे लक्षात येत नाही. तो मनातल्या मनात म्हणाला, किंवा तो असे म्हणाला होता, असे विधान आल्यास पुढील मजकूर एकेरी अवतरणातच लिहावा. एखाद्या वाक्यातील विशिष्ट शब्दावर जोर द्यायचा असल्यास तो शब्द एकेरी अवतरणात लिहावा. एखाद्या पूर्ण वाक्याला महत्त्व द्यायचे झाल्यास ते पूर्ण वाक्य एकेरी अवतरणात घ्यावे. थोडक्यात, प्रत्यक्ष संभाषण, संवाद चालू असतानाची विधाने दुहेरी अवतरणात लिहिली जावी. इतर वेळी फक्त एकेरी अवतरण वापरावे.

**(६) कंस ( (...) )**

एकापुढे एक असे अनेक मुद्दे स्पष्ट करताना प्रत्येक मुद्द्याला क्रमांक दिला जातो, त्या वेळी कंस वापरतात. जसे- मुद्दा क्र. (१), (२), (३). कधी कधी अंकांऐवजी वर्णाक्षरेसुद्धा वारली जातात. जसे- (अ), (आ), (इ). नेहमी पूर्ण कंस वापरावा, अपूर्ण कंस वापरू नये. १), २) किंवा अ), आ) हे चूक आहे. एखाद्या शब्दाचे स्पष्टीकरण देताना मजकुरातील आणखी एका शब्दांचा अर्थ देण्याची गरज असते, अशा वेळी दोनदा कंस वापरला जातो. तेव्हा मुख्य स्पष्टीकरण चौकोनी कंसात आणि दुय्यम स्पष्टीकरण गोल कंसात लिहिण्याची पद्धत आहे. जसे- [स्पष्टोच्चारित अनुनासिकेबद्दल अनुस्वार (शीर्षबिंदू) वापरावा.]

**(७) काकपद (^)**

आपल्या मनात विचार, भावना, कल्पना येत राहतात आणि लेखणीतून झरझर उतरून शब्दरूप धारण करतात. ज्या वेळी आपण लिखित मजकुराचे वाचन करू लागतो त्या वेळी आपल्या लक्षात येते, की काही गोष्टी सांगायच्या राहून गेल्या आहेत. राहिलेली गोष्ट सांगणे आवश्यक असते; पण लिहायला पुरेशी जागा नसते. मग आपण दोन ओळींच्या मधल्या जागेत दाटीवाटीने एखादे वाक्य किंवा शब्द लिहितो. नंतरचा मजकूर कोणत्या शब्दानंतर वाचायचा हे दर्शवण्यासाठी लेखनात ^ अशी खूण वापरतात. यालाच काकपद म्हणतात. उदाहरणार्थ, हे चिन्ह कावळ्याच्या पायांप्रमाणे दिसत असल्याने त्याला काकपद असे म्हटले आहे.

**(८) संयोग व अपसरण चिन्ह (–)**

या दोन्ही चिन्हांमध्ये थोडासा फरक आहे. दोन शब्द संयोगचिन्हाद्वारे जोडून लिहिले जातात. जसे– लहान–मोठे, दहा–बारा इत्यादी. लिहिताना ओळीच्या शेवटी येणारा शब्द तिथे मावत नसेल, तर तो शब्द तोडून शब्दाचा अर्धा भाग खालच्या ओळीत आणावा लागतो. अशा वेळी संयोगचिन्हाचा वापर केला जातो. शब्द कोठे तोडायचा याचेही विशिष्ट संकेत आहेत. उदाहरणार्थ, 'वाचनवेग' हा शब्द ओळीच्या शेवटी मावत नसल्यास 'वाचन' लिहून त्यापुढे संयोगचिन्ह जोडावे आणि 'वेग' शब्द खालच्या ओळीत लिहावा 'वाच' वरच्या ओळीत आणि 'नवेग' खालच्या ओळीत लिहू नये. सरदार शब्द ओळीच्या शेवटी आल्यास सर–दार किंवा सरदा–र असा न तोडता पूर्ण शब्द खालच्या ओळीत लिहावा. अपसरण चिन्ह हे संयोगचिन्हापेक्षा थोडे लांब असते. स्पष्टीकरण देताना या चिन्हाचा वापर केला जातो. उदाहरण देताना, स्पष्टीकरण देताना जसे– शब्दापुढे जी रेघ ओढलेली असते ते अपसरण चिन्ह होय.

**(९) विकल्पचिन्ह (/)**

हे किंवा ते असे पर्यायी शब्द लिहिताना दोन्ही शब्दांच्या मध्ये जे चिन्ह वापरले जाते त्याला विकल्पचिन्ह म्हणतात. उदाहरणार्थ, पुढे संस्थेचे/ व्यक्तीचे नाव लिहावे. या ठिकाणी संस्थेचे किंवा व्यक्तीचे नाव लिहिणे अपेक्षित आहे, हे विकल्पचिन्हावरून लक्षात येते. हल्ली या चिन्हाचा वापर अनेक ठिकाणी होताना दिसतो. उदाहरणार्थ, हा पत्ता पाहा. श्रीजी, ए-३/१८, पुणे. या ठिकाणी ए-३/१८ याचा अर्थ ए-३ या इमारतीमधील फ्लॅट क्र. १८ असा आहे. शासन निर्णयात अनेक संदर्भ अंकित करताना / या चिन्हाचा उपयोग केलेला दिसतो. जसे– शासन निर्णय क्र. वेतन १९९९/ प्र. क्र. २/ संवा–३, वित्त विभाग मंत्रालय.

**(१०) अवग्रहचिन्ह (ऽ)**

काही वेळा शब्दातील विशिष्ट अक्षराचा उच्चार लांबवलेला असतो. लांबलेला हा उच्चार दर्शवण्यासाठी ऽ या चिन्हाचा वापर केला जातो. याला अवग्रहचिन्ह म्हटले आहे. जेवढा उच्चार अधिक लांबलेला असेल तेवढ्या

प्रमाणात हे चिन्ह अधिक वेळा वापरतात. संभाषणात, गाण्यात या चिन्हाचा वापर होतो. जसे– अरे, श्याऽऽऽऽम, लवकर ये. किंवा जोऽऽजो रे बाळा, जोऽ जो।

### (११) अनुस्वार (-̇)

भाषेतील सर्व विरामचिन्हे शब्दाच्या मागेपुढे, क्वचित शब्दाच्या मध्ये येतात; मात्र, अनुस्वार सर्वच अक्षरांवर 'स्वार' होऊन येत असल्यामुळे त्याला 'अनुस्वार' म्हटले आहे. आधी अक्षर, नंतर अनुस्वार, या क्रमामुळे त्याला हे नाव मिळाले आहे. अनुस्वारालाच शीर्षबिंदू असेही म्हणतात. खरे तर हे एक टिंब असते. वाक्याच्या शेवटी आल्यावर ते पूर्णविराम होते. अनुस्वाराचा वापर अनेक ठिकाणी होतो. वर्णमालेत ङ्, ञ, ण, न, आणि म अशी पाच अनुनासिके आहेत. शब्दातील अक्षरांवर दिसणारे अनुस्वार अनुनासिकांऐवजी आलेले असतात. उदाहरणार्थ, मंगल – (मङ्गल), चंचल – (चञ्चल), घंटा– (घण्टा), मंदिर– (मन्दिर), चंपक (चम्पक). संस्कृत भाषेत कंसात दाखवल्याप्रमाणे लेखन होते. तात्पर्य, अनुस्वार हे अनुनासिकांऐवजी आलेले असतात. अनुस्वार काही अक्षरांवर स्वार होण्याचे वेगळे एक कारण आहे. उदाहरणार्थ, पुढील दोन वाक्ये वाचा : (१) रस्त्यावर दुतर्फा उंच उंच झाडे आहेत. (२) रस्त्यावर दुतर्फा उंच उंच झाडं आहेत. दोन्ही वाक्यांचा अर्थ एक आहे; पण दोन्ही वाक्यांत 'झाड' शब्दाचे अनेकवचनी रूप वेगळे आहे. दुसऱ्या वाक्यात 'झाडे' ऐवजी 'झाडं' असा शब्द आहे. इथे मात्रा न देता 'डं' वर शीर्षबिंदू दिला आहे. जरी हा अनुस्वार दिसत असला तरी त्याचा उच्चार अनुस्वारासारखा नाही. 'डं' मधे 'अ' स्वराचा उच्चार थोडा लांबलेला आहे. आणखी काही उदाहरणे पाहा– त्याचं, गाणं, माझं, झालं, बरंच, खरंच, बसलं इत्यादी. थोडक्यात, अनुनासिके आणि मात्रा या दोन्हींची कामे -̇ चिन्हाद्वारेच पूर्ण होतात.

◆

माधव राजगुरू
चलभाष : ९४२३५६९०८४





अनुक्रमणिका



परीक्षण

वर्षा तोडमल

# संशोधनाची उपयुक्त प्रणाली

■■

**डॉ. क्षीरसागर यांचा प्रबंधाच्या सूचिविषयक प्रकरण फार महत्त्वाचे आहे. ग्रंथाच्या अखेर असणाऱ्या निर्देश सूचीमुळे, थोड्या वेळात ग्रंथाचे संपूर्ण दर्शन अभ्यासकाला होते, हा सूचीचा सर्वांत मोठा फायदा. अशी निर्देश सूची कशी करावी याचे तंत्र त्यांनी सांगितले आहे. अपुरी, दिशाभूल करणारी सूची ग्रंथालाच कशी मारक ठरते, त्याचप्रमाणे वाङ्मयचौर्याचे वाढते प्रकारही लेखिकेने उल्लेखिले आहेत.**

■■




■■

**प्रबंधलेखनाची पद्धती**
**डॉ. शकुंतला क्षीरसागर**
**युनिव्हर्सल प्रकाशन**

संशोधन हा ज्ञानाचा अविभाज्य घटक आहे. मानवी जीवनात संशोधनाचे महत्त्व फार मोठे आहे. वर्तमान ज्ञानात नवीन ज्ञानाची भर घालणे हे संशोधनाचे मूलभूत कार्य आहे. संशोधन ही अत्यंत काळजीपूर्वक आणि टीकात्मक स्वरूपाची चौकशी असून त्याद्वारे तथ्ये आणि तत्त्वे शोधून काढली जातात. काही तरी निश्चित ज्ञान प्राप्त करण्यासाठी यात जाणीवपूर्वक तपास केला जातो. संशोधन म्हणजे कोणत्याही ज्ञानशाखेत नवीन तत्त्वे अथवा तथ्ये शोधण्यासाठी आणि जुनी तथ्ये व तत्त्वे परीक्षणासाठी केलेला चिकित्सक व पद्धतशीर असा अभ्यास आहे, आणि याच अभ्यासाची विशिष्ट लेखनपद्धती आहे.

प्रामुख्याने नव्याने संशोधन करणाऱ्या लेखकाला समोर ठेवून डॉ. शकुंतला क्षीरसागर यांनी 'प्रबंधलेखनाची पद्धती' हा महत्त्वपूर्ण ग्रंथ लिहिला आहे. ऐंशीव्या वर्षानंतर आजारपणावर मात करत सुधारित दुसरी आवृत्ती लिहून त्यांनी पूर्ण केली आहे. पुणे विद्यापीठाच्या जयकर ग्रंथालयात ग्रंथालय सहायक, वरिष्ठ ग्रंथालय सहायक आणि सहायक ग्रंथपाल या वेगवेगळ्या पदांवर १८५८ ते १९९१ या तेहतीस वर्षे केलेल्या नोकरीचा प्रदीर्घ अनुभव या पुस्तकामागे आहे. पुण्याच्या युनिव्हर्सल प्रकाशनाने प्रकाशित केलेली ही दुसरी सुधारित आवृत्ती एम.फिल., पीएच.डी. आणि संशोधन क्षेत्रात काम करणाऱ्या साऱ्यांनाच उपयुक्त आहे.

एकूण ११ प्रकरणांमध्ये विभागणी केलेल्या या पुस्तकात प्रबंधाच्या विषयनिवडीपासून प्रबंधाची प्रस्तावित रूपरेषा, प्रबंधाचे लेखन, टीपांचे उद्देश, वाङ्मयचौर्याचे प्रकार, टीपांना क्रमांक देण्याची पारंपरिक पद्धत यांचे सूत्रबद्ध विवेचन वाचायला मिळते. या दुसऱ्या आवृत्तीत पहिल्या आवृत्तीतला सर्व भाग आहेच, पण त्याबरोबर काही अधिकचा मजकूर दिला आहे.

१)' ऑनलाइन' मिळणारी माहिती मोफत असली, तरी तिचा उपयोग करताना टीपेमध्ये संदर्भ दिला नाही तर ते वाङ्मयचौर्य ठरते. २) मराठी शोधप्रबंधाच्या वर्णनात्मक सूचीचा थोडक्यात परिचय. ३) मुद्रितशोधनाची एक नवी पद्धत व मुद्रितशोधनाच्या निवडक खुणांचा तक्ता. ४) एमएलए पद्धतीनुसार अभ्याससाधनांची सूची आणि विवेचनात गोल कंसामध्ये संदर्भ देण्याची पद्धत. ५) तात्पुरत्या सूचीमधील नोंदींचे एमएलए पद्धतीनुसार नोंदीचे नमुने. ६) उल्लेखसूचीमध्ये पृष्ठक्रमांकाऐवजी विभाग क्रमांक दिले आहेत. तसेच अध्यापनाचा अनुभव नसणाऱ्या अभ्यासकांसाठी मौखिक परीक्षेची तयारी करण्यासाठी येथे काही उपयुक्त सूचनाही केल्या आहेत.

प्रबंधाच्या प्रस्तावित रूपरेषेचे लेखन, सेमिनारमध्ये प्रबंधाचे सादरीकरण, प्रबंधाची अक्षरजुळणी, बांधणी आणि प्रबंध जमा करताना घेण्याची काळजी,



अनुक्रमणिका



तसेच मौखिक परीक्षेची तयारी यांच्या बाबतीत लेखिकेने पुणे विद्यापीठाच्या नियमांचा उपयोग केलेला दिसतो. या दुसऱ्या आवृत्तीत सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या २०१४ सालापासून अमलात आलेल्या सुधारित नियमांचा उपयोग व उल्लेख केला आहे. याचे कारण हे, की ११ जुलै २००९ रोजी किंवा त्यानंतर पीएच.डी.साठी नाव रजिस्टर केलेल्या अभ्यासकांसाठी २८ नोव्हेंबर २०१४ या तारखेपासून सुधारित नियमांची अंमलबजावणी सुरू झाली आहे.

लेखिका डॉ. शकुंतला क्षीरसागर या ३३ वर्षे जयकर ग्रंथालयात सहायक ग्रंथपाल म्हणून कार्यरत होत्या, त्यामुळे या क्षेत्रातील दांडगा स्वानुभव 'ग्रंथालयाचा उपयोग कसा करावा?' या प्रकरणातून वाचायला मिळतो. ज्या ग्रंथालयाची निवड अभ्यासकाने केली असेल त्या ग्रंथालयाची वर्गीकरण पद्धती ढोबळमानाने समजून घेतली पाहिजे. ग्रंथालयातील वेगवेगळ्या सूची, उदा. क्रमिक पुस्तके, अन्य पुस्तके, नियतकालिके, प्रबंध, हस्तलिखिते इत्यादींच्या सूचींची जागा व वर्णानुक्रमरचना समजून घेण्याची सवय अभ्यासकाला अनेक संदर्भग्रंथ वापरतानाही उपयोगी पडते. वेळ न गमावता सूची पाहता येणे, ही गोष्ट वर्णक्रम पाठ असला तरच जमते. म्हणूनच ग्रंथालयाचा उपयोग कसा करायचा हे शिकणे, ही संशोधक होण्यासाठी आवश्यक असणारी पहिली पायरी आहे असे ऊशरप चशाशीळपस यांनी म्हटले आहे. संशोधनात्मक लेखन आणि ग्रंथालये यांचा संबंध अतूट आहे हेच खरे.

डॉ. क्षीरसागर यांचा प्रबंधाच्या सूचिविषयक प्रकरण फार महत्त्वाचे आहे. ग्रंथाच्या अखेर असणाऱ्या निर्देश सूचीमुळे, थोड्या वेळात ग्रंथाचे संपूर्ण दर्शन अभ्यासकाला होते, हा सूचीचा सर्वांत मोठा फायदा. अशी निर्देश सूची कशी करावी याचे तंत्र त्यांनी सांगितले आहे. अपुरी, दिशाभूल करणारी सूची ग्रंथालाच कशी मारक ठरते, त्याचप्रमाणे वाङ्मयचौर्याचे वाढते प्रकारही लेखिकेने उल्लेखिले आहेत.

१) वेबसाइटवरून उतरवलेला भाग अवतरणचिन्हांमध्ये न देता किंवा वेबसाइटचा आधार न देता स्वतःच्या लेखनात वापरणे. २) ऑनलाइन माहिती कोणालाही विनामूल्य मिळत असली तरी तिच्या मूलस्रोताचा उल्लेख न करता ती वापरली तर ते वाङ्मयचौर्य ठरते. ३) काही सत्य गोष्टी किंवा Facts कुठून मिळवल्या याचा उल्लेख न करणे. ४) टिपणे घेताना सारांश, दुसऱ्या शब्दांत रूपांतर आणि अवतरणे यामध्ये फरक न करता नंतरच्या विवेचनामध्ये टिपणांतील मजकूर स्वतःचा आहे असे भासवणे इत्यादी.

जोसेफ गिबाल्डी यांनी 'प्लॅगॅरिझम' या नावाने एक स्वतंत्र प्रकरण 'एमएलए हॅन्डबुक ऑफ रायटर्स ऑफ रिसर्च पेपर' या ग्रंथात लिहिले आहे. त्यातील वाङ्मयचौर्याच्या प्रकारांवर त्यांनी जसा प्रकाश टाकला आहे. त्याचप्रमाणे वाङ्मयचौर्य टाळून लेखन कसे करावे यासंबंधी सूचना केल्या आहेत.

एकूणच, नैतिकतेच्या सर्व मर्यादा सांभाळून लेखन करण्यासाठी कोणती दक्षता घ्यावी याविषयी लेखिकेने मार्गदर्शन केले आहे.

वास्तविक पाहता संशोधकाने निवडलेल्या विषयाइतकेच तांत्रिक अंगांनाही अतिशय महत्त्व आहे. ही तांत्रिक अंगे काटेकोरपणे, काळजीपूर्वक अन् शास्त्रशुद्ध स्वरूपात वापरली तर प्रबंधलेखनाला निर्दोषता प्राप्त होते. नेटकेपणा-नेमकेपणा येतो, मांडलेला नवा विचार प्रभावी पद्धतीने प्रकट झाल्याने वाचकांवर तो खोल परिणाम करतो. त्यातील विस्कळीतपणा नाहीसा होतो, बेजबाबदारपणा नाहीसा होतो. म्हणून विषयनिवडीइतकेच आणि त्याच्या व्यासंगाइतकेच तांत्रिक अंगांनाही महत्त्वाचे स्थान आहे. तांत्रिक अंगांचे डॉ. दु. का. संत यांनीही तीन प्रवर्ग कल्पिलेले आहेत. ते असे : १) प्रारंभीय, २) माध्यमीय किंवा मुख्यांगीय, ३) उत्तरीय. लेखनदृष्ट्या मुख्य भागाइतकाच उत्तरीय भागही महत्त्वाचा ठरतो. 'प्रबंधलेखनाची पद्धती' हा ग्रंथही या घटकांवर प्रकाश टाकतो. प्रबंध साधार आणि सप्रमाण असावा यासाठी साधनांच्या तळटीपा देणे, उत्तरीय भागात दर्शिका म्हणजे इन्डेक्स आणि परिशिष्टे यांचा केलेला समावेश हा प्रबंधाला निर्दोष व परिपूर्ण बनवितो. प्रबंधाच्या अखेरीला सादर केलेली परिशिष्टे ही ग्रंथाची उपयुक्तता व महत्त्व वाढविण्यास उपयोगी पडतात. त्यातूनही प्रबंधाला परिपूर्णता व भरघोसपणा प्राप्त होतो. या पुस्तकाच्या शेवटीही परिशिष्टातील संशोधनविषयक लेखांमुळे ग्रंथाला वेगळाच आयाम प्राप्त झाला आहे. झपाट्याने बदलत असलेल्या आजच्या काळात ज्ञान हीच आता शक्ती बनली आहे. ज्ञानसंपन्नता हे समाजाचे आणि राष्ट्राचे भांडवल झाले आहे. म्हणूनच नवे ज्ञान, नवे तंत्रज्ञान आणि नवे संशोधन यांनाही अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले आहे.

प्रबंधलेखनाला आवश्यक असणारी अन् तितकीच उपयुक्त असणारी संशोधनाची पद्धती, उपांगे यांचा ढोबळ स्वरूपात घेतलेला आढावा येथे संपत असला, तरी दुर्धर आजारांवर मात करत अत्यंत चिकाटीने ८०व्या वर्षानंतरही संकल्पित लेखन पूर्ण करणाऱ्या डॉ. शकुंतला श्रीकृष्ण क्षीरसागर यांचे हे पुस्तक अभ्यासकांना उपयुक्त ठरणारे आहे.

◆

**डॉ. वर्षा तोडमल**

इ-मेल : Varsha.todmal@gmail.com



परीक्षण

डॉ. सुरेश सावंत

# 'रात्र, दुःख आणि कविता'

■■

**'रात्र' आणि 'दुःख' हे या कवितेचे मध्यवर्ती आशयसूत्र आहे. जगण्याचे हलाहल पचवून आपली कविता निळकंठ झाली आहे असे कवयित्रीला वाटते. हीच या कवितेची आणि कवयित्रीची खरी ओळख आहे. कवयित्री कविता का लिहिते? या कवितेचे प्रयोजन काय? कवयित्री केवळ हौस म्हणून कविता लिहीत नाही किंवा आपल्या प्रतिभेचा आविष्कार करण्यासाठीही कविता लिहीत नाही. सामाजिक क्रांतीला इंधन पुरविण्यासाठी आपण कविता लिहितो आहोत, असाही कवयित्रीचा आवेश किंवा अभिनिवेश नाही.**

■■



■■

रात्र, दुःख आणि कविता
कवयित्री- अंजली कुलकर्णी
प्रकाशक- पद्मगंधा प्रकाशन, पुणे.
पृ. ११८, मूल्य- १२० रु.

अंजली कुलकर्णी ह्या एक प्रथितयश कवयित्री आहेत. त्यांच्या 'मी एक स्त्रीजातीय अस्वस्थ आत्मा' (१९९५), 'संबद्ध' (१९९७) आणि 'बदलत गेलेली सही' (२००९) ह्या तीन कवितासंग्रहांनी त्यांची ही ओळख अधिक गडद केली आहे.

'रात्र, दुःख आणि कविता' हा अंजली कुलकर्णी यांचा मे .२०१५ मध्ये प्रकाशित झालेला चौथा कवितासंग्रह. प्रस्तुत संग्रहात कवयित्रीने आपल्या कवितांची १) 'रात्र', २) 'दुःख', आणि ३) 'कविता' अशा तीन विभागांत मांडणी केली आहे. असे असले, तरी डॉ. नीलिमा गुंडी यांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे त्यातील केंद्रवर्ती सूत्र एकच आहे. ते सूत्र आहे निर्मिती तत्त्व. 'रात्र' आणि 'दुःख' ही अंजली कुलकर्णी यांच्या कवितेच्या भावाशयाची दोन प्रमुख केंद्रे आहेत. कवयित्रीने कविताविषयक कवितांचा विभाग सर्वांत शेवटी घेतला असला, तरी आस्वादाच्या दृष्टीने त्या कवितांचा सर्वप्रथम विचार करणे आवश्यक आहे. कविताविषयक कवितांचा विचार सुरुवातीला केल्यामुळे कवयित्रीचा काव्यविषयक दृष्टिकोन, त्यांच्या प्रेरणा, त्यांची काव्यविषयक भूमिका समजून घ्यायला तसेच आधीच्या दोन विभागांतील कवितांच्या आकलन आणि आस्वादाला साहाय्य होणार आहे.

'रात्र' आणि 'दुःख' हे या कवितेचे मध्यवर्ती आशयसूत्र आहे. जगण्याचे हलाहल पचवून आपली कविता निळकंठ झाली आहे असे कवयित्रीला वाटते. हीच या कवितेची आणि कवयित्रीची खरी ओळख आहे. कवयित्री कविता का लिहिते? या कवितेचे प्रयोजन काय? कवयित्री केवळ हौस म्हणून कविता लिहीत नाही किंवा आपल्या प्रतिभेचा आविष्कार करण्यासाठीही कविता लिहीत नाही. सामाजिक क्रांतीला इंधन पुरविण्यासाठी आपण कविता लिहितो आहोत, असाही कवयित्रीचा आवेश किंवा अभिनिवेश नाही. कारण

*'खरे तर माझी परिवर्तनाची व्याख्या*
*नाही रांगोळीच्या छापाइतकी साचेबंद.'*
(हिमनगासारखी, पृ.११५)

कवयित्रीची भूमिका इतकी स्वयंस्पष्ट आहे. मग कवयित्रीच्या लेखी कविता म्हणजे आहे काय?

*'प्रत्येक कविता म्हणजे*
*तुकड्या-तुकड्याने आत्महत्या*
*आत्मनाशाचा कैफ ओसरेपर्यंत*



अनुक्रमणिका



*लिहीत राहणे*
*जगण्यासाठी थोडे थोडे*
*विष पचवत राहणे.'* (पृ. ९७) अशा स्वच्छ शब्दांत कवयित्रीने आपली काव्यविषयक भूमिका स्पष्ट केली आहे. 'दुःखभोग' हे या कवितेचे प्रमुख आशयसूत्र आहे. जगण्याच्या दहशतीत आत्मा ओलीस ठेवलेला आहे याची रास्त जाणीव कवयित्रीला आहे, म्हणून ती सहजपणे लिहून जाते–

*'मी लिहिते कविता*
*ओळींमागून ओळी, ओळींमागून ओळी*
*रक्तातून भळभळत जाणाऱ्या.'* (पृ. ९७)

ह्या कवितेचा कवयित्रीच्या रक्ताशी असा अपरिहार्य संबंध आहे. म्हणून कवयित्री आपल्या जगण्याचे इंगित, श्रेयस, प्रेयस आणि जिवंत असण्याचा हेतूही आपल्या कवितेत शोधते (पृ. ९९). किंबहुना कविता हाच कवयित्रीचा जीवनाधार आहे.

*'नजर पोचेल तिथपर्यंत*
*डहुळतो समुद्र माझ्या आतल्या कवितेचा*
*माझ्या पेश- पेशी गातच असतात*
*कवितेच्या ओळी.'*
('तळ्यात मळ्यात', पृ. १०२)
*'कविता लिहिणं इतकं अंगावर येईल*
*असं वाटलं नव्हतं.*
*कविता लिहिणं असं आयुष्य ओढून घेईल*
*असं वाटलं नव्हतं.'* (कविता लिहिणं, पृ. १०३)
*माझ्या मेंदूतून झिरपते आहे ओघवत्या*
*ओळींची एक प्रकाशलड,*
*अगदी कविताच...'* (प्रकाशलड, पृ. ११०)
*घोटाघोटानं यावं विष प्यायला*
*तसं भिनत गेलंय दुःख सर्वांगात.'*
(कवितेमधूनसुद्धा, पृ. ११३)
*'या कवितेला तर*
*काही म्हणता काहीच कळत नाही माझं*
*नुसताच छळ मांडते ती*
*श्वासही घेऊ देत नाही पुरता.'* (वांझ, पृ. ११४)
किंवा
*'जगणे भोकं पडलेल्या जहाजासारखे*
*कलंडू लागते*
*कविता हिमनगासारखी सात अष्टमांश*
*पाण्याखालीच राहते...'* (हिमनगासारखी, पृ. ११५)

जीवनाला अंतर्बाह्य व्यापून असणाऱ्या कवितेविषयीची तक्रार, संताप, अपेक्षाभंग, अपुरेपणाचे दुःख, अशी विविधस्वरूपी अनुभूती या कवितांमधून व्यक्त झाली आहे.

कवयित्रीची कविताविषयक भूमिका समजून घेतल्यानंतर आता आपण 'रात्र' ह्या पहिल्या विभागातील कवितेकडे वळू.

सुरुवातीच्या ५० पृष्ठांतील ३२ कवितांमधून कवयित्रीने रात्रीची विविध रूपे चितारली आहेत. रात्र म्हणजे गडद अंधार, निबिड काळोख. रात्र म्हणजे दुःख, दैन्य, दारिद्र्य, घोर, चिंता, काळज्या, अशुभ, गूढ, भयावह, अनाकलनीय, विरूप. पण ह्या कवितेतील रात्रीचे नानाविध भ्रम-विभ्रम पाहून, वाचून वाचकही स्तिमित होतो.

'रात्र-रात्रभर माझ्या जगण्याची प्रत तपासत राहते' असे कवयित्रीला वाटते. म्हणून कवयित्री रात्रीबद्दल कृतज्ञतेने उद्गार काढते :

*'ही रात्र माझी राखणदार, तारणहार*
*ही रात्र असते रात्री म्हणून दिवसा मी जगते.'*
(राखणदार, पृ. १७)
*'एखाद्या अभिसारिकेसारखी रात्रीला सामोरी*
*जाण्यास उत्सुक असते.'*
(पायऱ्या-पायऱ्यांनी, पृ. १८)

रात्रीच्या चित्राची निगूढ सुंदरता ती घुटक्या-घुटक्यांनी पिते. काळ्याकुट्ट रात्रीचे केवढे हे उन्नयन! आपल्या भूमिकेतील दिवस-रात्रीतील पालट कवयित्री पुढील शब्दांत अधोरेखित करते :

*'दिवसभर मी असते आई बाई*
*काहीबाही*
*जगाचे व्यवहार करंगळीवर पेलणारी गृहिणी*
*रात्री मी बनते योगिनी*
*जागृत कुंडलिनी*
*सरसर सर्पिणी.'* (पायऱ्या- पायऱ्यांनी, पृ. १८)
*'सरसर सर्पिणी' ह्या शब्दसंहतीतून विशिष्ट असा*
*रोमांचकारी ध्वनी निर्देशित होतो.*
*'रात्रीच्या एकान्तगुहेत बसलाय*
*कुणी ध्यानस्थ साधू*
*त्याच्याभोवती उभारलंय*
*असीम शांततेचं वारूळ.'* (अनुष्टुभ, पृ. २१)
*अशा काळ्याकुट्ट अंधाऱ्या रात्री 'आत्मटोकेचे*
*खंजीर छातीत खुपसत राहतात'* (पृ.२३)
*'उन्मुक्त केस उन्मुक्त डोळे*
*वस्त्रांत वारा सरारा खेळे*
*पेशींच्या हाका मनसोक्त ऐकार*

*देठातली कस्तुरी उधळून फेका.'*

(सृजतोत्सव, पृ. २७)

ही आणखी काही रात्रींची रोमँटिक रूपे. ही रात्र म्हणजे भली चतुर जादुगारीण आहे असे कवयित्रीला वाटते. ही जादुगारीण दिवसभर श्रमलेल्या प्रत्येकाच्या हातात काळोखाचा मत्त प्याला देत असते. ही रात्र कवयित्रीला प्रणयिनी, बहुरूपिणी, मायाविनी आकांक्षिणी, सर्पिणी अशा बहुविध रूपांत जाणवते.

कवयित्रीला ही रात्र म्हणजे चेटकिणीचा गर्द काळा शृंगार वाटतो. पापपुण्याच्या कुंपणावर जन्ममुक्त देहस्वीपण भोगणारी ही रात्र कवयित्रीला चवचाल बाईसारखी वाटते :

*'चवचाल असते रात्र*
*बाईसारखी*
*खुणावते चाळवते*
*नाचते भिंगरीसारखी.'* (चवचाल, पृ.३०)

अंजली कुलकर्णी यांच्या कवितेचा एकूणच रचनाबंध मोठा, सुबक, पिळदार आणि रेखीव आहे. कवयित्रीने 'फकीर' या कवितेत महानगरीय रात्रीची बहुविध रूपे मोठ्या ताकदीने टिपली आहेत.

*'रात्र कलंदर वेड्या फकिरासारखी*
*रात्रभर भटकत राहते शहरांतून गल्लीबोळांतून.'*

तिला कुठे कोपऱ्यातली खसफस ऐकू येते, तर कुठे आडोशाचा फायदा उठवून उधाणलेला बेघर वासनेचा अंधारसमुद्र दिसतो. कुठे रक्तामांसाची उसळलेली भरती दिसते, तर कुठे हातपाय ताणून प्राणांतिक रडणारे एक बेवारस तान्हुले सत्य दिसते. (फकीर, पृ. ३३-३४)

कधी कधी कवितागत 'मी'ला रात्रीच्या वेळी खिडकीबाहेरची सुंदर रात्र खुणावतेसुद्धा अशा वेळी कवयित्रीला प्रश्न पडतो-

*'प्रत्येक बाई म्हणजे एक खिडकी*
*की प्रत्येक रात्र म्हणजे असते*
*बाईचे निमूट भरणारे पात्र?'*
(रात्र; खिडकी आणि बाई, पृ. ३५)
*'तिच्या डोळ्यांत रात्र*
*तिच्या केसांत रात्र*
*तिच्या मनात रात्र*
*आटोकाट*
*काठोकाठ.'* (तिच्या डोळ्यांत रात्र, पृ. ४०)

इतकी ही रात्र 'तिच्या' जीवनाचा अविभाज्य भाग बनली आहे. 'आटोकाट' आणि 'काठोकाठ' या प्रासयुक्त शब्दांनी या रात्रीचे सर्वसंचारी आणि सर्वव्यापी स्वरूप अधोरेखित केले आहे. 'जगण्याचं कलेवर', 'जगण्याच्या लळ्यालोंब्यात', 'काळोखाचा मत्त प्याला', 'इच्छांचे तरंग', 'काळोखपिंजला कापूस' इत्यादी प्रतिमांनी रात्रीच्या घनगर्द काळोखाला अनाम सौंदर्य बहाल केले आहे.

*'दुःख दडपलं गेलं की कुठून तरी वाट शोधतं,*
*हा मानसशास्त्रीय सिद्धांत कवयित्रीला नीट*
*ठाऊक असल्यामुळे*
*'निळासावळा डोह हा अंतरंगी*
*जरी स्तब्ध वरुनी जळे सारखा ।*
*जरी पृष्ठपाणी न हाले ना चाले, तरी आत*
*शांतीस हा पारखा'* (डोह, पृ. ६१)

असे सांगून कवयित्रीने वरून शांत दिसणाऱ्या शांत डोहाच्या अंतरीचे दुःख उजागर केले आहे. 'सुख म्हणजे नक्की काय असते?' हा प्रत्येकालाच पडणारा आदिम प्रश्न. या प्रश्नाचा पाठपुरावा कवयित्रीने मोठ्या धीटपणे केला आहे. 'कुठल्या झाडाचं फूल असतं सुख म्हणजे, झपकन खुडून माळता येतं केसांत?' असा प्रश्न कवयित्रीलाही सतावतो आहे.

*'मॉल लुटून मालामाल होतायत माणसे*
*सोशल नेट लावून तासन्तास*
*गळाला लागतायत मासे*
*हा कुणासाठी बांधलाय मायावी महाल?*
*आभासात घसरून गटांगळ्या खातायत माणसे.'*
(सुख म्हणजे, पृ. ६३-६४)

हे समकालीन सामाजिक वर्तमान आहे. सर्व काही आहे पण सुख नाही, ही समकालीन मानवी जगण्यातील सार्वत्रिक स्थिती कवयित्रीने शब्दांच्या चिमटीत नेमकेपणी पकडली आहे.

*'हे आतलं उद्‌ध्वस्त उत्खनन थांबणार तरी कधी?'* (उद्‌ध्वस्त, पृ. ६९) हा प्रश्न कवयित्रीला भंडावून सोडतो आहे. अशा परिस्थितीत *'कधी तरी झाले मी नीलवर्ण दुःखमोर'* (दुःखमोर, पृ. ७७) असा अनुभव कवयित्रीला येतो. मोराचा वर्ण सुंदर, नील आणि नेत्रदीपक असला, तरी सनातन दुःख हेच त्याचे प्राक्तन आहे. तरीसुद्धा सगळे पचवून-रिचवूनही ही कविता बंडखोरीची भाषा बोलत नाही.

'सुरुवात टूथपेस्टनं' या कवितेच्या शेवटी कवयित्री म्हणते-

*'तो एक जग ठोकरलेला झेन तत्त्वज्ञानी*
*हसून सांगत राहतो*
*प्रत्येकाचे सहावे सुख असते वेगळे*
*ज्याने त्याने ते शोधायचे असते एकट्याने.'*
(पृ. ८४)

आयुष्य म्हणजे पंखभाजलं पाखरू आहे. त्याची तडफड आणि तगमग वाचकांपर्यंत पोचविण्यात कवयित्री कमालीची यशस्वी झाली आहे. एक अनाम वेदना ह्या कवितेतून सतत पाझरत आहे. 'काळाचं जनावर 'आ' वासून पहुडलंय' याची जाण या कवयित्रीला आहे. 'स्वप्नांना घरात घेतल्याची ही मोठीच शिक्षा कवितागत 'मी' भोगते आहे.' (आपणच, पृ. ८८-८९)

अनाकलनीय दुःखाचा अखंड शोध आणि अपरिहार्य दुःखाच्या स्वीकाराचे समंजस भान ह्या कवयित्रीजवळ आहे. ते पुढील ओळींतून व्यक्त झाले आहे-

*'दुःख माणसाला शहाणे बनवते*
*दुःखात तत्त्वज्ञान शोधतो माणूस*
*सुखदुःखाच्या पार जाते दुःख*
*दुःख माणसाला संत बनवते.'*
(दुःखालाही असते वय, पृ. ८६-८७)

अंजली कुलकर्णी यांची अनलंकृत कविता काव्यात्मतेची अशी उंची गाठते.

आत्मताडन हा या कवितेचा स्वभाव आहे आणि आत्मसंवाद हा या कवितेचा स्थायीभाव आहे.

*'हे कुणा दुसऱ्याशी नाही*
*माझं माझ्याशीच आहे माझं भांडण.'* (भांडण, पृ. ५६) हे कवयित्री प्रांजळपणे कबूल करते. नात्यांच्या विद्रूप चेहऱ्यांची कवयित्रीला किळस वाटते.

*'कधी संपेल वाळूचा समुद्र?*
*अनंताकडून अनंतापर्यंत सुरू आहे गिनती.'*
(गिनती, पृ. ५८)

ही दुःखाची गिनती काही संपता संपत नाही, म्हणून केवळ श्वासमुक्त होण्याच्या प्रतीक्षेत असलेली काव्यगत 'मी' साक्षात मृत्यूला हिमतीने आवाहन करते :

*प्रहर संपायच्या आत*
*प्रहार कर*
*ये, लवकर ये.'* (ये, पृ. ८५)

वास्तविक अंजली कुलकर्णी ह्या मंचीय कवयित्री नव्हेत. त्यांची कविता साध्या-सोप्या शब्दांतून वाचकांशी थेट संवाद साधते. त्यांच्या कवितेला प्रतिमा-प्रतीकांचा फारसा सोस नाही; तरीसुद्धा 'स्वप्नभारला ग्लास', 'काचेरी वास्तव', 'लालचुटूक चेटूक', 'दुःखमोर', 'दिवसभराचा नकाशा', 'काळाचं जनावर', 'वास्तवाची विस्तवधग' ह्या मोजक्याच प्रतिमा-प्रतीकांनी दुःखाला आणि अंतिमतः कवितेला अनाम उंची प्रदान केली आहे. या कवितांना आंतरिक व्यक्तित्वाचे उत्खनन, उपसणी, उकलणी, तपासणी करीत 'स्व'ला जाणून घेण्याचा उत्कट ध्यास आहे.

*'चालण्यासाठी होते भरभक्कम पाय*
*आणि हृदयात ईर्ष्येचा निखारा*
*जवळ होते आत्मबळ आणि*
*डोळ्यांत स्वप्नांचा पिसारा.'* (आपणच, पृ. ८८) हे या कवयित्रीचे पाथेय आहे आणि हेच या कवितेचे बलस्थान आहे.

*'घोर पातकासारखी लिहिली कविता*
*येलता येत नसताना उचलले शिवधनुष्य'* (घोर पातकासारखी, पृ. १०६) असे जरी कवयित्रीने म्हटले असले, तरी या निवेदनात वास्तवापेक्षा विनयाचाच भाग अधिक आहे हे वाचकांच्या लक्षात येते. प्रत्यक्षात कवयित्रीने कवितेचे शिवधनुष्य लीलया पेलले आहे याची प्रचिती येते. प्रस्तुत संग्रहातील कविता म्हणजे संवेदनशील कविमनाने असंवेदनशील भवतालाबद्दल नोंदविलेली उत्स्फूर्त प्रतिक्रिया आहे. या कवितेत कवयित्रीने स्वतःला निर्ममपणे छिलले आहे, तासले आहे, सोसले आहे. एका वाक्यात सांगायचे, तर ही कविता वास्तवाच्या विस्तवावर उभी आहे.

*'शब्दांची रंगीत फुले पसरली तरीही*
*लागली ठेच अन् विव्हळून उठले मीही*
*तळमळून हसले डोळे पुसता पुसता*
*ओहो! सुंदर! जीवघेणी ही कविता...'*
(जीवघेणी ही कविता, पृ. ११७)

अंतिमतः संग्रह मिटवून ठेवताना कवयित्रीप्रमाणेच वाचकांच्या ओठांवरही स्वाभाविकपणे हीच प्रतिक्रिया उमटते, 'ओहो! सुंदर! जीवघेणी ही कविता!'

आशय आणि अभिव्यक्तीच्या अंगाने 'रात्र, दुःख आणि कविता' ह्या संग्रहातील एकूण कविता वाचकाला अस्वस्थतेचे दान देऊन जाते. रविमुकुल यांनी रेखाटलेले संग्रहाचे मुखपृष्ठ पुरेसे बोलके आणि अन्वर्थक आहे. पद्मगंधा प्रकाशनाने आपल्या परंपरेला साजेशी ह्या संग्रहाची देखणी निर्मिती केली आहे. उत्कृष्ट कलाकृतीसाठी कवयित्री, चित्रकार आणि प्रकाशक हे तिघेही अभिनंदनास पात्र आहेत.

◆

**डॉ. सुरेश सावंत**
शाहूनगर, नांदेड
मोबाइल : ९४२२१७०६८९



परीक्षण

भालचंद्र शिंदे

**रा. ना. चव्हाणांना महर्षी शिंदे यांचा तौलनिक व समन्वयी वारसा लाभला होता. आधुनिक महाराष्ट्राच्या जडणघडणीच्या या महत्त्वपूर्ण कालखंडातील अनेक महत्त्वाच्या घटना-घडामोडी, सामाजिक प्रश्न, समस्या अशा विविध अंगोपांगांवर त्यांनी अत्यंत मौलिक, दिशादर्शक व द्रष्टे विचार व्यक्त केले. विशेषतः वंचित, उपेक्षित जनसमूह हा त्यांच्या विचारविश्वाच्या केंद्रस्थानी होता. समाजातील शेवटच्या माणसाला न्याय देण्याची त्यांची वृत्ती होती, म्हणूनच ते थेट गौतम बुद्धांपर्यंत जातात. राजा राममोहन रॉय हा त्यांचा अभ्यास विषय होता.**

मराठी वाङ्मयीन प्रवाहाचा परखड समाचार घेणारे रा. ना. चव्हाण यांचे 'मराठी साहित्य, समाज आणि संस्कृती' हे पुस्तक नुकतेच प्रकाशित झाले असून हे ३२ वे पुष्प आहे. रमेश चव्हाण आणि त्यांच्या बंधूंनी आपल्या वडिलांच्या स्मृतिप्रीत्यर्थ वाई येथे रा. ना. चव्हाण प्रतिष्ठान स्थापन केले आहे. प्रतिवर्षी महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या नावे पुरोगामी लेखक, विचारवंत व समाजसुधारक यांना ते हा पुरस्कार देत असतात. या वर्षीचा पुरस्कार मुस्लिम सत्यशोधक मंडळाचे अध्यक्ष प्रा. शमसुद्दिन तांबोळी, पुणे यांना मिळाला आहे. रा. ना. चव्हाण यांनी खूप लेखनिर्मिती केली खरी, परंतु ते साहित्य अद्यापपावेतो प्रकाशित झाले नव्हते. आता अर्धेअधिक प्रकाशित झाले असून अजून अर्धे प्रकाशित व्हायचे आहे. ती मंडळी प्रतिवर्षी पुस्तकरूपाने प्रकाशित करत आहेत. तो एक आगळावेगळा कार्यक्रम असतो. मराठी साहित्य, समाज आणि संस्कृती याबद्दलचे रा. ना. चव्हाणांचे चिंतन या स्वरूपात पाहावयाला मिळत आहे. यापूर्वी आमच्या कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषदेचे मुखपत्र 'माझी मराठी' भाग एक व दोन यातून आम्ही रा. ना. चव्हाण यांच्याबद्दलची विस्तृत माहिती प्रकाशित केली आहे. त्यामुळेच पूर्वीच्या निजाम राजवटीतील आणि सध्याच्या कन्नड राजवटीतील मराठी लोकांना सत्यशोधक समाज, ब्राम्हो समाज, प्रार्थना समाज यांची ओळख झाली, रा. ना. चव्हाणांच्या साहित्याचा परिचय झाला. या पुस्तकाने त्यात भर पडत आहे. रा. ना. चव्हाण प्रतिष्ठानने हे पुस्तक प्रकाशित केले असून रमेश चव्हाण हे संपादक व प्रकाशक आहेत. प्रा. डॉ. अरुण शिंदे यांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना या पुस्तकास लाभली आहे.

या पुस्तकातील लेख हे इ. स. १९७३ ते इ. स. १९९३ या कालावधीतील असून, त्यात पुनरुक्तीचा दोष आहे हे स्वतः संपादकांनी मान्य केलेले आहे. दरम्यानच्या काळात साहित्य, समाज व संस्कृतीने मोठी घोडदौड केलेली आहे याची मलाही जाणीव आहे. मग मी या विषयाकडे का वळलो? एक- 'उपेक्षित रा. ना. चव्हाण' याचा उलगडा मला प्रत्यक्ष रा. ना. चव्हाण यांचे वाङ्मय वाचून झाला आहे. दोन- विद्वान म्हणविणारे, प्रकांड पंडित म्हणविणारे जे साहित्यिक होते त्यांच्याबद्दलची बरीच माहिती रा. ना. चव्हाणांकडून आम्हाला कळत आहे. ते उपेक्षित का राहिले याचे स्पष्ट उत्तर त्यांच्या लेखनात सापडते. याचे विश्लेषण व्हावे हा मुख्य उद्देश ठेवून मी हा



# वाङ्मयीन-सांस्कृतिक प्रवाहांचा परखड समाचार

## रा. ना. चव्हाण यांचे 'मराठी साहित्य, समाज आणि संस्कृती'



अनुक्रमणिका



उपद्व्याप करतो आहे.

रा. ना. चव्हाण एक समाजचिंतक होते. निकोप समाज निर्माण व्हावा अशी त्यांची मनोमन इच्छा होती. तसे त्यांनी प्रयत्न केले; पण निकोप समाज निर्माण झाला का, याचे सिंहावलोकन करण्यास हे पुस्तक उपयोगी पडेल. रा. ना. चव्हाण हे समतोल व समन्वयवादी दृष्टिकोन ठेवून लिहिणारे, बोलणारे, वागणारे गृहस्थ होते. मग समकालीन विद्वान म्हणविणाऱ्या साहित्यिकांनी त्यांची उपेक्षा का केली? प्रकरणनिहाय याची चर्चा करू जाता त्याचा उलगडा होईल– 'बाप दाखव नाही तर श्राद्ध कर' या न्यायाने! रा. ना. चव्हाणांना महर्षी शिंदे यांचा तौलनिक व समन्वयी वारसा लाभला होता. आधुनिक महाराष्ट्राच्या जडणघडणीच्या या महत्त्वपूर्ण कालखंडातील अनेक महत्त्वाच्या घटना-घडामोडी, सामाजिक प्रश्न, समस्या अशा विविध अंगोपांगांवर त्यांनी अत्यंत मौलिक, दिशादर्शक व द्रष्टे विचार व्यक्त केले. विशेषतः वंचित, उपेक्षित जनसमूह हा त्यांच्या विचारविश्वाच्या केंद्रस्थानी होता. समाजातील शेवटच्या माणसाला न्याय देण्याची त्यांची वृत्ती होती, म्हणूनच ते थेट गौतम बुद्धांपर्यंत जातात. राजा राममोहन रॉय हा त्यांचा अभ्यास विषय होता. म्हातारे आई-वडील व तरुण बायको घेऊन ऐन उमेदीच्या काळात ज्यांनी महारांच्या लहान मुलींच्या केसांतील उवा काढल्या ते महर्षी वि. रा. शिंदे त्यांचे कायम आदर्श ठरतात. या पुस्तकात रा. ना. चव्हाणांनी गौतम बुद्ध, म. फुले, शाहू महाराज, छ. शिवाजी महाराज, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, राजारामशास्त्री भागवत, यशवंतराव चव्हाण, लक्ष्मणशास्त्री जोशी, कर्मवीर भाऊराव पाटील, बापूजी साळुंखे केंद्रवर्ती ठेवून लेखन केलेले आहे. त्यामुळे जेधे, मोरे, जवळकर, बागल यांच्यावरही वेळोवेळी प्रकाश पडतो. संबंधित वर्तमानपत्रे व त्यांचा दृष्टिकोनही कळतो.

रा. ना. चव्हाण यांनी साहित्य आणि समाज यांचा परस्पर अनुबंध उलगडून दाखविला आहे. त्यांच्या मते साहित्य आणि जीवन वेगळे करता येत नाही. व्यक्त होणे ही व्यक्तीची एक नैसर्गिक गरज असल्याने साहित्य हा जीवनाचा अविभाज्य भाग बनतो. साहित्य आणि समाज यांचा संबंध बिंब-प्रतिबिंबाप्रमाणे असतो. सामाजिक परिवर्तनानुसार साहित्यामध्येही बदल होत असतात.

रा. नां.च्या मते साहित्याचे ध्येय लोकशिक्षण व लोकसुधारणा हे असावे. संतसाहित्याने त्यांच्या काळानुसार लोकशिक्षण केले. साहित्याने समाजप्रबोधन व लोकजागृती केली पाहिजे, समाजाला इष्ट वळण लावले पाहिजे. साहित्याने नवा पुरोगामी पवित्रा घेतला पाहिजे. विशेष म्हणजे समाजातील दुर्बल, शोषित, पीडित लोकांच्या जीवनात आनंद फुलविण्यासाठी लेखन करावे असे रा. नां.ना वाटते. संत तुकारामांचा संदर्भ त्यांच्या लेखनात नेहमी येतो.

आधुनिक मराठी साहित्याचा प्रारंभ एकोणिसाव्या शतकात, अव्वल इंग्रजी काळात झाला. ख्रिश्चन मिशनरी, ब्रिटिश सनदी अधिकारी वगैरेंनी मराठी साहित्यामध्ये आधुनिक जाणिवा रुजविल्या असे रा. नां.ना वाटते. संतसाहित्याने वैचारिक व भावनिक आधार देण्याचे, मराठी लोकांना एकत्र ठेवण्याचे व 'मऱ्हाटी'पण टिकविण्याचे महत्त्वाचे काम केले असे रा. ना. चव्हाणांना वाटते. आजच्या काळातील ग्रामीण, दलित, मार्क्सवादी, स्त्रीवादी, जनवादी साहित्यप्रवाहांची दखल घेऊन त्यांचे स्वागत रा. नां.नी केलेले आहे. विशेषतः वैचारिक साहित्याला अधिक महत्त्व दिलेले आहे. त्या काळात लोकहितवादी, म. फुले, न्या. रानडे, आगरकर, महर्षी शिंदे, लो. टिळक, म. गांधी, डॉ. बाबासाहेब आंबेडकर




**मराठी साहित्य, समाज आणि संस्कृती**
**लेखक : रा. ना. चव्हाण**
**संपादक : रमेश चव्हाण**
**पृष्ठे : २२८, किंमत : रु. २३०/-**
**प्रकाशक : रमेश चव्हाण**

इत्यादींच्या साहित्यात वैचारिकता होती याच्याबद्दल रा. नां.नी आनंद व्यक्त केला असून, अलीकडील काळात वैचारिकता कमी झाल्याबद्दल खेदही व्यक्त केला आहे.

खेड्याच्या निर्मितीपासून ग्रामीण साहित्याचा प्रारंभ झाला. सुरुवातीच्या काळात ते मौखिक स्वरूपात अभिव्यक्त होई. मौखिक साहित्य काव्यरूपाने अधिक व्यक्त होत असे. मौखिक साहित्य बऱ्याच प्रमाणात बुडाले. शेती, शेतकरी या विषयाशी ग्रामीण साहित्य निगडित असले पाहिजे असे रा. नां.ना वाटते. त्यांनी शेतकरी, स्त्री, दलित यांच्याबद्दल तुसडेपणा ठेवता कामा नये. सहकार्य, समन्वय, समन्याय या तत्त्वांचा स्वीकार करावा; नाही तर 'फोडा आणि झोडा' ही प्रस्थापित नीती यशस्वी होईल, याची जाणीव रा. नां.नी करून दिली आहे. ग्रामीण व दलित साहित्यिकांचे अनुभवविश्व व जीवननिष्ठा एकच असतात, तेव्हा या दोन्ही साहित्यिकांनी भूमिनिष्ठ राहिले पाहिजे. खेड्याशी असलेली आपली नाळ तुटू देता कामा नये. ग्रामीण साहित्याने बहुजन समाजाला जागृत केले पाहिजे. इहवाद, बुद्धिवाद, वैज्ञानिक दृष्टिकोन लोकांत वाढविला पाहिजे. लोकमानसाचे वैचारिक परिवर्तन हे ग्रामीण साहित्याचे प्रयोजन असावे. साहित्यिक चळवळीला कृतिशीलतेची जोड असावी. दलित व ग्रामीण या दोन्हींत एकोपा असावा. दलित साहित्यिकांकडून ब्राह्मणी साहित्यावर, साहित्यिकांवर व मराठा समाजावर टीका होत असते, ती होता कामा नये. शिवाय, दलित व ग्रामीण एक असले पाहिजेत, हा नवा विचार रा. ना. चव्हाणांनी मांडला हे विशेष होय. भारत हा खेड्यापाड्यांचा देश असूनही शेतीप्रधान समाज साहित्यात पूर्णपणाने दिसत नाही असे त्यांना वाटते. ग्रामीण साहित्याने म. फुले, वि. रा. शिंदे, सत्यशोधक समाज यांपासून प्रेरणा घ्यावी असे त्यांना वाटते. त्यांच्या मते ग्रामीण व दलित साहित्याची प्रेरणा म. फुले हीच आहे. आज दलित साहित्यिक आपली (दलित साहित्याची) प्रेरणा डॉ. बाबासाहेब आंबेडकर ही मानतात. रा. नां.नी आपली वेगळी भूमिका मांडली आहे.

पिळले जाणाऱ्यांचे साहित्य ते दलित साहित्य, असे रा. ना. मानतात. विषमतेचे निर्मूलन करून न्याय, समता, सत्य प्रस्थापित करणे हे दलित साहित्याचे प्रयोजन आहे. जगात कोठेही अन्याय, गुलामगिरी, पक्षपात, उपेक्षा असेल तेथे दलितांच्या न्याय्य हक्कांचा पुरस्कार करणारे दलित साहित्य निर्माण होते, असे रा. ना. म्हणत.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे दलित साहित्याचे प्रवर्तक व वैचारिक प्रेरणास्रोत मानले जातात. डॉ. आंबेडकरांनी दलितांना अस्मिता दिली, त्यांच्या उद्धाराचे राजकारण- समाजकारण केले. त्यांच्या विचारकार्यातून प्रेरणा घेऊन जे साहित्य निर्माण झाले ते दलित साहित्य. गौतम बुद्ध, चोखामेळा, कबीर, तुकाराम, म. फुले, गोपाळबाबा वलंगकर, किसन फागू बनसोडे, म. शिंदे, डॉ. आंबेडकर अशी दलित साहित्याची पूर्वपरंपरा रा. नां.नी अधोरेखित केली आहे. दलितेतरांनी दलित जीवनावर लिहावे, अशी भूमिका रा. नां.नी घेतली आहे. उदा. वि. रा. शिंदे (भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न), श्री. म. माटे (अस्पृश्यतेचा प्रश्न). या संदर्भात रा. ना. आग्रही होते.

एकोणिसाव्या शतकात लोकहितवादी, आगरकर आदींनी ब्राह्मण समाजाचे दोष दाखविले, त्यामुळे ब्राह्मण समाजात सुधारणा झाल्या. त्याप्रमाणे म. फुले व डॉ. आंबेडकर यांच्या अनुयायांनी ब्राह्मण व ब्राह्मणी धर्मग्रंथांवर टीका करून फारसा कार्यभाग उरकणार नाही; त्यांनी आपले दोष, उणिवा समजून घेऊन त्या दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे, अशी भूमिका या प्रश्नी रा. ना. घेताना दिसतात.

रा. नां.नी आणखी एक नवीन विचार मांडला. दलितांकडेसुद्धा जमीन आहे. त्या संदर्भात लिखाण व्हायला हवे. शेती सुधारणेबद्दल बोलले, लिहिले जावे. त्याऐवजी संघर्ष, विद्रोह, लढा यात शक्ती खर्च केली जाते असे रा. नां.ना वाटते. दलित ग्रामीण साहित्याने ब्राह्मणवादाला फक्त विरोध करण्याची भूमिका घेऊ नये; सत्यशोधनाची भूमिका घेऊन वास्तवाची चिकित्सा करावी, फुले-आंबेडकर यांचीही बदलत्या संदर्भाप्रमाणे चिकित्सा करावी, अशी भूमिका त्यांनी मांडली आहे. राजकीय, सामाजिक परिस्थितीनुसार डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी वि. रा. शिंदे व म. गांधी यांच्याशी वैचारिक मतभेद केले. आता काळ बदलला आहे. राष्ट्रीय एकात्मता व अखंडत्वासाठी समन्वयाची जरुरी आहे, अशी भूमिका रा. नां.नी मांडली आहे. कोणत्याही साहित्याने स्वतःला भिंती बांधून आत कोंडून ठेवू नये; अन्यथा साहित्याला मर्यादा पडून त्याची प्रगती व विकास थांबेल, अशी दलित साहित्याची परखड चिकित्सा रा. ना. चव्हाण यांनी केली आहे.

दलितांचे दुःख, गुलामगिरी, पिळवणूक, अनुभव जिवंतपणे अभिव्यक्त करण्याचे व त्या शोषणास नकार देण्याचे काम फक्त दलित साहित्यच करू शकते, अशी ठाम भूमिका रा. ना. चव्हाण घेताना दिसतात. दलितत्व जोपर्यंत असेल तोपर्यंत दलित साहित्य अस्तित्वात राहील. कोणीही

दलित मागास राहू नये, हेच दलित साहित्याचे स्वप्न असावे. दलित व ग्रामीण साहित्याने परस्परांशी सहकार्य करीत वर्धिष्णू झाले पाहिजे, अशी अपेक्षा त्यांनी व्यक्त केली आहे.

रा. ना. चव्हाणांनी 'बहुजनवर्गीय साहित्याची जरुरी व महत्त्व' स्पष्ट करणारे लेखन केले आहे. बहुजन हा शब्द गौतम बुद्धाने प्रथम वापरला. त्या वेळी या संज्ञेचा अर्थ 'सर्वसामान्य प्राकृत जन' असा होता. बौद्ध, जैन, भागवत धर्म यांचे प्राकृत साहित्य हे बहुजन साहित्य आहे, कारण ते जास्तीत जास्त लोकांच्या हितासाठी निर्माण झाले. बहुजन समाजाच्या उद्धारार्थ जे साहित्य निर्माण होते ते बहुजन साहित्य होय. संतसाहित्य हे बहुजन साहित्य होते, असे रा. ना. चव्हाण म्हणतात. 'बहुजन साहित्य' या संकल्पनेतून त्यांना दलित व ग्रामीण साहित्याचे एकत्रीकरण अभिप्रेत होते. या दोन्हींच्या एक होण्याने जोमदार प्रवाह निर्माण व्हावा अशी त्यांची इच्छा होती. त्यामुळे एक भक्कम सांस्कृतिक प्रवाह निर्माण होईल असे त्यांना वाटे. जातिवर्णभेदाच्या पलीकडे जाऊन वर्तमानातील प्रश्न मांडले पाहिजेत. ग्रामीण भागातील बहुजन समाज आणि दलित वर्ग यांच्यामधील दरी व विषमता मिटविण्यावर त्यांनी सातत्याने भर दिला आहे. नामांतराच्या पार्श्वभूमीवर रा. नां.चा हा विचार अत्यंत महत्त्वपूर्ण वाटतो. ते सतत एका गोष्टीचा पाठपुरावा करताना दिसतात, जे सत्य आहे. ते म्हणतात, वारकरी संप्रदायाने अठरापगड जातींचे ऐक्य आध्यात्मिक क्षेत्रात करून दाखविले. आज ही एकी सामाजिक, धार्मिक, आर्थिक, राजकीय बाबतीत घडली पाहिजे, तरच महाराष्ट्र महान होईल. यासाठी बहुजन साहित्याचा प्रवाह पुढे यावा, असे विचार त्यांनी व्यक्त केले. आज दलित, ग्रामीण साहित्याबरोबरच मुस्लिम मराठी, ओबीसी, आदिवासी, स्त्रीवादी साहित्य संमेलने भरत आहेत. समाज सजग झाला आहे, हे लक्षात घेता रा. नां.नी मांडलेला विचार किती दूरगामी स्वरूपाचा होता हे लक्षात येते.

बहुजन साहित्याला मजबुती येण्यासाठी रा. नां.नी त्याला लोकसाहित्याची कुमक द्यायला सांगितले. ते म्हणतात, शेतकरी-कष्टकरी निरक्षर जनसमूहाने लोकसाहित्य निर्माण केले. श्रवण, पाठांतर, गायन वगैरे साधनांद्वारे ते पिढ्यानूपिढ्या जपले व वाढवले. लोकगीते, लोककला, म्हणी, उखाणे, शिव्या, लोकनाट्य, कलगीतुरा, तमाशा वगैरे प्रकारांमधून लोकसाहित्य निर्माण झाले. म्हणी म्हणजे लोकमानसाचा अनुभवसिद्ध शहाणपणाचा आविष्कार होय. आलुतेदार, बलुतेदार जनसमूहामधून कवी, शाहीर, लोकनाट्यकार निर्माण झाले. इथे एक गोष्ट स्पष्ट करू इच्छितो. बलुतेदार बारा आहेत तर आलुतेदार अठरा. एकूण तीस. सांगून-सवरून तीस जनसमूहांतून जोरकसपणाने आपले अनुभव वेगवेगळ्या रूपाने साहित्यात येऊन मिसळत आहेत. ते मजबूत होत आहे. कुणी कितीही नको म्हटलं तरी! हे रा. नां नी अगोदरच सांगून ठेवलं होतं; पण रा. नां. ची उपेक्षा झाली. मार्क्सवादी साहित्याबद्दलही रा. नां.नी लिहिले असून मार्क्सवादी पांढरपेशा शहरी बुद्धिजीवी लेखकांनी हिंदुधर्माची व वैदिक धर्माची पुष्कळ निःपक्षपाती अशी चिकित्सा केली आहे. भाषेच्या संदर्भात रा. नां.नी मत मांडले आहे. संस्कृत ही उच्चवर्णीयांची भाषा. वेदादी साहित्यामुळे ती ज्ञानभाषा झाली परंतु लोकभाषा झाली नाही. लोकसाहित्य प्रामुख्याने प्राकृत भाषेमध्ये निर्माण झाले. जैन, बौद्ध व महानुभावांनी प्राकृत भाषेत धर्मविचार सांगितला, त्यामुळे सामान्य जनतेची पारमार्थिक भूक भागविली गेली. भाषासंपर्कातून भाषासंकर होतो व तो अटळ आहे, असे रा. नां.चे मत आहे. त्यामुळे अरबी, पारशी, उर्दू, इंग्रजी शब्द मराठीत आले.

वाङ्मयीन क्षेत्रातील जातीयता, वर्चस्ववाद, कंपूशाही यावर रा. ना. चव्हाण यांनी परखड भाष्य केले आहे. सध्या 'प्रस्थापित' असा शब्द वापरला जातो आहे. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीमध्ये रा. ना चव्हाणांनी हे प्रयत्न केल्याने ते उपेक्षित राहिले. 'मराठी साहित्यातील पक्षपाती न्याय' या लेखामध्ये रा. नां.नी मराठी समाज व मराठी साहित्यातील जातीय अहंकार व वर्चस्ववादी प्रवृत्तीची ऐतिहासिक परंपरा दाखवून दिली आहे. कोणत्याही व्यक्तीची, चळवळीची, साहित्याची चिकित्सा, मीमांसा केली पाहिजे- नीरक्षीरविवेकबुद्धीने परीक्षण केले पाहिजे. त्यामुळे सामाजिक, सांस्कृतिक व्यवहार प्रगल्भ होतो. दुर्दैवाने मराठीमध्ये छिद्रान्वेषीवृत्तीने अवहेलना, निंदा, उपहास करण्याची परंपरा निबंधमालाकार चिपळूणकर यांनी सुरू केली व तिची उत्तरोत्तर भरभराट होत असल्याचे आढळते, असे मत चव्हाण यांनी व्यक्त केले आहे. 'मराठी साहित्याला वर्चस्ववादाचा कॅन्सर झाला आहे' अशा कठोर शब्दांमध्ये रा. नां.नी या प्रवृत्तीवर आसूड ओढला आहे. मराठी साहित्यातील कॅन्सरची बाधा प्रथम निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी सुरू केली. लोकहितवादी, म. फुले, स्वामी दयानंद सरस्वती, केशवचंद्र सेन वगैरेंवर टीका करताना त्यांनी छिद्रान्वेषी निंदालेख लेखनाचा प्रघात

सुरू केला, त्यांना 'गर्दभानंद' म्हणून हिणविले. मोडकांनी ते उघडकीस आणले. पुढे 'केसरी' व त्यांच्या प्रभावळीने ही परंपरा जोमाने चालविली. महाराष्ट्रातील सामाजिकवादाचे व विग्रहाचे जनकत्व या चिपळूणकरी परंपरेकडे जाते. आपल्या वर्णजातिश्रेष्ठत्वाचे आणि बौद्धिक शहाणपणाचे प्रदर्शन इतिहासाच्या नावाखाली करण्याची 'वहिवाट' व 'कुळहक्क' मराठी साहित्यात रूढ झाला आहे. मराठी साहित्य रोगी आहे. प्रथितयश, प्रख्यात साहित्यिक, विचारवंत, संशोधकांचा जातीय अहंकार व बौद्धिक दर्प पाहिला की मराठी साहित्याच्या व मराठी समाजाच्या निकोप वाढीची व भवितव्याची चिंता वाटते, असा निष्कर्ष रा. ना. चव्हाणांनी काढला आहे. मराठी सांस्कृतिक-वाङ्मयीन क्षेत्रावर पांढरपेशी वर्चस्ववाद आढळतो. इंग्रजी शिक्षण प्रथम वरिष्ठ वर्गाने घेतले व तथाकथित वरिष्ठ वर्गाची नोकरशाही अद्याप चालू आहे. साहित्य परिषदा, इतिहास संशोधक मंडळ वगैरेंसारख्या साहित्यिक-सांस्कृतिक कोल्हापूर, इंदूर वगैरे संस्थानिकांच्या आश्रयाने मराठी साहित्याची वृद्धी झाल्याची नोंद केली आहे. अनेक साहित्यिक विद्वान, पंडित राजाश्रयाने वाढले. राजसत्तेकडून भाषा, साहित्य, संस्कृती संवर्धनाचे अनन्यसाधारण कार्य कसे केले जाते याचा आदर्श वस्तुपाठ या संस्थांनी निर्माण केला, हे ऐतिहासिक सत्य रा. नां.नी उजागर केले आहे. स्वातंत्र्योत्तर काळातही अनेक लेखक राजसत्तेशी जवळीक करून लाभ उठवीत आहेत/असतात. अनेक विद्वान वारा येईल तशी पाठ फिरवितात व पगडी फिरवून जगण्यात भूषण मानतात, यावरही रा. नां.नी प्रकाश टाकला आहे. यासाठी काही साहित्यिकांची उदाहरणे दिली आहेत.

वैचारिक साहित्य सामान्य वाचकांमध्ये अभावानेच वाचले जाते. यात वाढ व्हावी. प्रबोधनपर साहित्यामुळेच समाज सुधारतो असे त्यांना वाटे.

रा. ना. चव्हाणांचे वाचन, चिंतन अफाट होते. त्यांच्याकडे मूल्यनिर्णयन करणारी समीक्षादृष्टी होती.



**वाङ्मयीन क्षेत्रातील जातीयता, वर्चस्ववाद, कंपूशाही यावर रा. ना. चव्हाण यांनी परखड भाष्य केले आहे. सध्या 'प्रस्थापित' असा शब्द वापरला जातो आहे. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीमध्ये रा. ना चव्हाणांनी हे प्रयत्न केल्याने ते उपेक्षित राहिले. 'मराठी साहित्यातील पक्षपाती न्याय' या लेखामध्ये रा. नां.नी मराठी समाज व मराठी साहित्यातील जातीय अहंकार व वर्चस्ववादी प्रवृत्तीची ऐतिहासिक परंपरा दाखवून दिली आहे. कोणत्याही व्यक्तीची, चळवळीची, साहित्याची चिकित्सा, मीमांसा केली पाहिजे- नीरक्षीरविवेकबुद्धीने परीक्षण केले पाहिजे. त्यामुळे सामाजिक, सांस्कृतिक व्यवहार प्रगल्भ होतो.**

चळवळी बहुजन समाजापर्यंत व बुद्धहरिजनांपर्यंत गेल्या नाहीत. अजून तरी गेल्या आहेत काय? वाङ्मयीन स्वराज्य कधी मिळणार? विद्वत्तेचे लोकशाहीकरण कधी होणार? सर्व क्षेत्रांतील मक्तेदारी कधी जाणार? संतकवींनी या मक्तेदारीला प्रथम आळा घातला व मराठी साहित्य जनताभिमुख केले. आधुनिक मराठीमध्ये हा वर्चस्ववाद चिवटपणे वाढतो आहे. बहुजनवादी लेखकांनी संशोधनात लक्ष घालून खोट्या धूळफेकी संशोधनाने उजेडात आणल्या पाहिजेत, बहुजन समाजाने या क्षेत्रातील आपली निद्रावस्था व मागासलेपणा टाकून दिला पाहिजे, बहुजनांनी बौद्धिक क्रांती केली पाहिजे, असे आवाहन रा. ना. चव्हाण यांनी सातत्याने केले आहे. फुले-आंबेडकरांना खंडन करण्यात सारा जन्म घालवावा लागला. यात त्यांचा वेळ गेला नसता तर त्यांच्याकडून आहे त्यापेक्षा व्यापक विषयांवर ग्रंथलेखन झाले असते. साहित्य आणि राजकारण, साहित्यिक व राजकारणी, साहित्य संमेलने व राजकारणी यावरही रा. नां.नी प्रकाश टाकला असून, बडोदा, 'मराठी वृत्तपत्रांचा इतिहास' (रा. के. लेले), 'दलितांची नियतकालिके' (हरिश्चंद्र निर्मळे) या ग्रंथांची समीक्षा रा. नां.नी केली आहे. तसेच सत्यशोधक विचाराच्या बहुजन पत्रकारितेचा व्यापक परामर्श त्यांनी घेतला आहे. म. फुले यांच्या साहित्याची समीक्षाही रा. नां.नी केली आहे. पूर्वपरंपरेचे सम्यक् आकलन, तौलनिक समन्वयवादी दृष्टिकोन, चिकित्सक सत्यशोधकी शैली, परिवर्तनशील भूमिका, नव्याचे स्वागत करण्याचे उमदेपण, सांस्कृतिक वाङ्मयीन व्यवहारांच्या निकोप विकासाची आस, ही रा. ना. चव्हाणांच्या समीक्षालेखनाची वैशिष्ट्ये आहेत. त्यांनी विविध ग्रंथांच्या केलेल्या समीक्षण-परीक्षणांमधून चांगल्याची केलेली पाठराखण व मर्यादांचे विवेकी सूचन केलेले दिसून येते. विधायक, रचनात्मक, तौलनिक अन्वेषक समीक्षेची रुजवात त्यांनी केली. ग्रामीण व दलित साहित्यिक अभ्यासकांनी संशोधनाकडे गंभीरपणे वळावे असे रा.नां.ना वाटते. इतिहास संशोधनाच्या बाबतीत मराठीत फार प्रदूषण आढळते. मराठीतील काही

उच्चवर्णीय इतिहासकारांनी एकांगी, पक्षपाती इतिहासलेखन करून अनिष्ट पायंडा पाडला आहे. इतिहासलेखनामध्ये उच्चभ्रू, नागर विद्वानांचे वर्चस्व आहे. बहुजन समाजातील तरुण अभ्यासकांनी वासुदेव लिंगोजी बिर्जे, वि. रा. शिंदे, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, भास्करराव जाधव यांचा आदर्श समोर ठेवावा. सत्यशोधनार्थ विचारप्रवर्तक संशोधन, लेखन करावे. संशोधनासाठी मिशनरी वृत्तीने वाहून घेतलेली माणसे पाहिजेत. संशोधन, साहित्य या क्षेत्रांमध्ये धर्मनिरपेक्ष विचार मांडले पाहिजेत.

रा. ना चव्हाण यांनी मराठी साहित्य व मराठी समाज यांचा परस्परसंबंध अनुबंध उलगडणारे लेखन करून साहित्य व समाज यांच्या परस्परसंबंधावर अभ्यासपूर्ण प्रकाश टाकला आहे. साहित्य हे समाजाच्या जडणघडणीवर व विकासावर निर्णायक प्रभाव टाकत असते. आद्य शंकराचार्यांना प्रच्छन्न बुद्ध म्हणतात. त्यांनी भगवान बुद्धाचा धर्म हटविला नाही तर पचविला. त्यांच्या अद्वैत मताशी व वेदान्ताशी भेदाभेदप्रधान हिंदुधर्माचे हल्लीचे स्वरूप मुळीच जमत नाही. म्हणून तर रामानुजाचार्य, लिंबार्क, वल्लभाचार्य व मध्वाचार्य यांच्यासारखे थोर तत्त्वज्ञ व जाणते आचार्य झाले. तरी शंकराचार्यांचे महत्त्व, थोरवी शक्य तितके वाढविण्याचे सतत प्रयत्न होतात. आचार्य म्हणजे एकमेव आद्य शंकराचार्य व तेच फक्त ज्ञानेश्वरांचे वाटाडे (मार्गदर्शक), असा अर्थच घेतला जातो!

दुसऱ्या बाजीरावाची अशीच ओढाताण होत असते. द्रव्यलोभापायी स्वकीय श्रीमंत रास्ते सरकार (वाई) यांची दोन वेळा बाजीराव दुसरे यांनी जहागीर जप्त केली. दुसरे बाजीराव वाईस येणार असे अगोदर कळल्यामुळे दीडशे सुवासिनींनी त्यांचा जीव आडात टाकून दिला, अशी खास टीप 'पुणे वर्णन' नामक प्रसिद्ध व उपलब्ध पुस्तकात आढळते. दुसऱ्या बाजीरावाच्या नैतिक माहात्म्याचे वरीलसारखे अनेक पुरावे उपलब्ध आहेत. तरी ह्या बाजीरावाला असामान्य असा देशभक्त, मराठी दौलतभक्त ठरविण्याचे एकसारखे प्रयत्न होत असतात. पराक्रमाबद्दल काय सांगावे? अहल्याबाईंनी त्यांचा पराभव केला होता. असे हे साहित्य व असा समज रा. ना. चव्हाणांनी निर्भीडपणे उलगडून दाखविला आहे. वैचारिक साहित्य लोकमानसाची विचारप्रक्रिया व आचरण व्यवहार यांना नवा आशय देते. समाजाच्या प्रगल्भ, पुरोगामी विकासासाठी वैचारिक साहित्याची नितांत आवश्यकता असल्याचे रा. नां.नी सातत्याने प्रतिपादन केले आहे. ग्रामीण व दलित साहित्याने परिवर्तनवादी मूल्यविचार पेरण्याचे आवाहन त्यांनी केले आहे. ग्रामीण साहित्य, दलित साहित्य, स्त्रीवादी साहित्य, मार्क्सवादी साहित्य, बौद्ध साहित्य आदी साहित्यप्रवाहांचे खुल्या मनाने स्वागत केले आहे. इथे रा. नां.ची दूरदृष्टी दिसून येते. कारण काही मंडळी दलित साहित्यरूपी नागाच्या पिलाला वेळीच ठेचून मारण्याची भाषा करत होती. दलित साहित्याचा आवाका वाढताना दिसतो आहे. समाजपरिवर्तनाचा मूल्यात्मक विचार अभिव्यक्त व्हावा असे रा. नां.ना वाटते. वाङ्‌मयीन- सांस्कृतिक व्यवहारातील जातीयता, वर्चस्ववाद, कंपूशाही यांचा परखड समाचार त्यांनी घेतला आहे. वि. ल. भावे, वि. का. राजवाडे, केतकर यांच्या एकांगी व जातीयवादी लेखनावर व प्रवृत्तीवर त्यांनी सडकून टीका केली आहे. मराठी साहित्य-संशोधन क्षेत्रातील अपप्रवृत्ती व छिद्रान्वेषी वृत्ती यांची परंपरा, त्याचे दुष्परिणाम यांचे तपशीलवार विवेचन त्यांनी केले आहे. एके ठिकाणी ते म्हणतात, 'तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांना सन १९४२-४३ साली म. फुल्यांचे 'गुलामगिरी' हे पुस्तक 'न भूतो न भविष्यति' असे फार आवडले. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांना त्यांनी अद्वितीयपणे व धाडसाने प्रतिगामी ठरविले. पण रॅडिकल पक्षाचे तर्कतीर्थ ह्यांना तेच म. फुल्यांचे 'गुलामगिरी' पुस्तक आता 'अर्धसत्य', 'धोकादायक' व भयावह वाटते'! 'गुलामगिरी' पुस्तकातील जनतेच्या शिक्षणाची मागणी, पहिली कैफियत पुढे बारा-चौदा वर्षानंतर तर्कतीर्थांना दिसेनाशी झाली! चिवट वर्चस्ववाद व वर्चस्ववादातूनच पांगारकर, राजवाडे, वि. ल. भावे, विष्णुशास्त्री चिपळूणकर वगैरेंच्या साहित्यात पक्षपाती टीका व समर्थन आढळते. वर्चस्व टिकविण्याचा बौद्धिक युक्त्या, तंत्रे, चाणक्यनीती वगैरे स्वरूपाची 'दक्षता' आढळते! नव्या साहित्यिकांनी, संशोधकांनी या अपप्रवृत्तीचा वारा न लागू देता निःपक्षपातीपणे, तटस्थपणे, विवेक व व्यासंगाची कास धरून वस्तुनिष्ठ लेखन करावे, अशी वाङ्‌मयीन आचारसंहिता त्यांनी नमूद केली आहे. बहुजन समाजातून अभ्यासू संशोधक निर्माण व्हावेत व सांस्कृतिक पुनरुत्थानाचे नवपर्व सुरू व्हावे, अशी अपेक्षा त्यांनी व्यक्त केली आहे. मराठी समाजाचा सांस्कृतिक दस्तऐवज म्हणून रा.नां.चे लेखन दिशादर्शक ठरते.

◆

**भालचंद्र शिंदे**
१०-३/ ८६, विठ्ठलनगर, एन. व्ही. लेआऊट,
कलबुर्गी (गुलबर्गा) - ५८५१०३
मोबाइल : ९३४२६९८१८३



शाखा कार्यवृत्त

**प्रकाश पायगुडे**

# म.सा.प. पुणे शहर कार्यवृत्त नोंद

(१ सप्टेंबर २०१६ ते ३० नोव्हेंबर २०१६)

**१. दि. २२ सप्टेंबर २०१६ :**

मसाप गप्पा : लक्ष्मण गायकवाड यांची मुलाखत अरुण खोरे यांनी घेतली. उपस्थित श्रोत्यांनी प्रश्न विचारून गायकवाड यांच्याशी संवाद साधला. एकूणच सध्याच्या आरक्षणासंदर्भात भटक्या-विमुक्तांच्या प्रश्नासंदर्भात, तसेच महाश्वेतादेवी यांच्याशी आलेल्या संपर्कासंबंधात व स्वतःचे आगामी प्रकाशित होणाऱ्या साहित्याविषयी गायकवाड यांनी मनमुराद गप्पा मारल्या.

**२. दि. २४ सप्टेंबर २०१६ :**

विजय तेंडुलकर लिखित 'कमला' या नाटकाचे अभिवाचन डॉ. मधुरा कोरान्ने, सिद्धार्थ जोशी, ओंकार जाधव, सुनीता कुलकर्णी, वंदना जोशी यांनी नाटकातील निवडक प्रसंगांचे अभिवाचन करताना कमळाबाई, सरिता काकासाहेब जयसिंग आणि कमला ही नाटकातील गाजलेली पात्रे अभिवाचनातून जिवंत झाल्याचा श्रोत्यांनी अनुभव घेतला.

**३. दि. २६ सप्टेंबर २०१६ :**

'एक कवयित्री, एक कवी' या कार्यक्रमात संदीप खरे व डॉ. संगीता बर्वे यांचे कवितावाचन झाले. कार्यवाह ॲड. प्रमोद आडकर, उद्धव कानडे यांनी दोघांशी संवाद साधला.

**४. दि. २८ सप्टेंबर २०१६ :**

'श्रीकांत चौगुले यांनी निवेदन क्षेत्रातील आपले अनुभव नूमवि मुलींच्या शाळेमध्ये आयोजित केलेल्या 'लेखक तुमच्या भेटीला' या उपक्रमांतर्गत व्यक्त केले. विद्यार्थिनींनी अनेक प्रश्न विचारून त्यांच्याशी संवाद साधला.

**५. दि. ३ ऑक्टोबर २०१६ :**

म.सा.प. पुणे 'साहित्यदीप प्रतिष्ठान'च्या संयुक्त विद्यमाने 'कविता दुर्गेच्या- तीन पिढ्यांच्या' हे कवयित्रींचे कविसंमेलन घेण्यात आले. अध्यक्ष डॉ. नीलिमा गुंडी प्रमुख पाहुण्या व आसावरी काकडे, ज्योत्स्ना चांदगुडे यांची प्रमुख उपस्थिती होती. सूत्रसंचालन मृणालिनी जोशी यांनी केले. डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, अंजली कुलकर्णी, डॉ. संगीता बर्वे, संजीवनी बोकील, प्रभा सोनवणे, मीरा शिंदे, स्वाती सामक, मीनल बाठे, अनुराधा काळे, प्रतिभा पवार, आश्लेषा महाजन, वैशाली मोहिते, सुनीती लिमये, भाग्यश्री देसाई, ऋचा कर्वे, बालिका ज्ञानदेव, या कवयित्रींनी कविता सादर केल्या.

**६. दि. ६ ऑक्टोबर ते १० ऑक्टोबर २०१६ :**

म.सा.प. पुणे आणि 'पुणे बुक फेअर' यांच्या संयुक्त विद्यमाने ग्रंथप्रदर्शन, विक्री व साहित्यिक कार्यक्रम घेण्यात आले. पुण्याचे महापौर प्रशांत जगताप, प्रकाश मगदूम, कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या प्रमुख उपस्थितीत प्रदर्शनाचे उद्घाटन झाले. सायंकाळी विनोदी काव्यमैफल आयोजित करण्यात आली. बंडा जोशी, अनिल दीक्षित, भालचंद्र कोळपकर, अनिल गुंजाळ या कवींनी काव्यमैफल रंगवली. ८ तारखेला अंजली कुलकर्णी, जयंत भिडे, कविता क्षीरसागर, दीपक करंदीकर यांनी काव्यमैफल सजविली. १० तारखेला, 'जुन्या ग्रंथांतून नवे ग्रंथ' या विषयावर अगदी ज्ञानेश्वरीपासून जुन्या ग्रंथांतून नवे ग्रंथ निर्माण होण्याची पद्धत संपूर्ण भारतीय संस्कृतीत किती खोलवर रुजलीय त्याची असंख्य उदाहरणे देत डॉ. अशोक कामत यांनी आपले व्याख्यान दिले. 'पुणे बुक फेअर'चे पी.एन. राजन, श्री. भावे व श्री. जोशी उपस्थित होते.

**७. दि. १३ ऑक्टोबर २०१६ :**

'कै. विद्याधर पुंडलिक स्मृती पुरस्कार' : सचिन जोशी यांनी स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्याविषयीच्या व्यक्तिचित्राचे अभिवाचन केले. कै. विद्याधर पुंडलिकांनी हे व्यक्तिचित्र लिहिले आहे. साहिल पुंडलिक याने शारदा स्तवन सादर केले. प्रा. व. बा. बोधे यांना डॉ. वीणा देव यांच्या हस्ते पुंडलिक पुरस्कार प्रदान करण्यात आला. अभिजित थिटे व भारती पांडे हे निवड समिती सदस्य होते. कार्यवाह बंडा जोशी यांनी सूत्रसंचालन केले व वि. दा. पिंगळे यांनी आभार मानले.

**८. दि. १४ ऑक्टोबर २०१६ :**

ग्रंथप्रेरणा दिन (डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम जयंती) : डॉ. प्र. ल. गावडे यांच्या प्रमुख उपस्थितीत ग्रंथप्रदर्शनाचे उद्घाटन होऊन हा दिवस साजरा करण्यात आला. गंगाधर म्हमाणे, अनिल गुंजाळ, दिलीप बराटे, वा.गो. आपटे संदर्भ ग्रंथालयातील दुर्मिळ पुस्तकांची प्रदर्शनात मांडणी ग्रंथालयाच्या

सेवकांनी केली होती.

**९. दि. २१ नोव्हेंबर २०१६ :**

कै. योगिनी जोगळेकर स्मृतिदिन कविसंमेलन : म.सा.प.पुणे आणि काव्यशिल्प, पुणे या संस्थांच्या संयुक्त विद्यमाने निमंत्रितांचे कवीसंमेलन आयोजित करण्यात आले. ज्योती सरदेसाई, मिलिंद सुधाकर जोशी, अशोक भांबुरे, विजय सातपुते, ऋचा बर्वे, नारायण मोकाशी, सुजाता पवार, सुजित कदम या कवींनी सहभाग घेतला. चंचल काळे यांनी कविसंमेलनाचे व कार्यवाह दीपक करंदीकर यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले. वरील सर्व कार्यक्रमांत प्रा. मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे, सुनीताराजे पवार, दीपक करंदीकर, बंडा जोशी, उद्धव कानडे, वि. दा. पिंगळे, प्रमोद आडकर, यांनी प्रास्ताविक, आभार, सूत्रसंचालन, इत्यादी जबाबदाऱ्या पार पाडल्या.

– कार्यवृत्त नोंद व शब्दांकन :
**दीपक करंदीकर**, कार्यवाह, म. सा. प. पुणे.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : चाळीसगाव

**म. सा. प. व्याख्यानमाला :**

दि. १७, १८, १९ सप्टेंबर २०१६ रोजी व्याख्यानमाला झाली. यंदाचे हे तिसरे वर्ष होते. मा. जोतीराम फडतरे (सांगोला) यांच्या कथाकथनाने गुंफले गेले, तर द्वितीय पुष्प प्राचार्य यशवंत पाटणे (सातारा) यांच्या व्याख्यानाने सादर झाले. या प्रसंगी त्यांच्या 'सहावे सुख' या पुस्तकाचे प्रकाशन करण्यात आले. तिसरा दिवस म. सा. प. पुणेचे नाशिक जिल्हा प्रतिनिधी कवी-गीतकार प्रकाश होळकर यांच्या काव्यानुभवाने आनंद देऊन गेला. रसिकांचा वाढता प्रतिसाद हे व्याख्यानमालेचे वैशिष्ट्य ठरत आहे.

**कवी केशवसुत स्मृती कविसंमेलन :**

म. सा. प. पुणेच्या कार्यक्रमांच्या विकेंद्रीकरणाच्या योजनेत चाळीसगाव शाखेने मागणी केल्याप्रमाणे मिळालेल्या दोन कार्यक्रमांपैकी एक कवी केशवसुत स्मृती कविसंमेलन शाखा मेळाव्याच्या पूर्वसंध्येला आयोजित करण्यात आले होते. धुळे येथील प्रसिद्ध साहित्यिक मा. जगदीश देवपूरकर यांच्या अध्यक्षतेखाली निमंत्रित कवींच्या संमेलनाचे उद्घाटन म. सा. प. पुणेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते झाले. या वेळी मसापच्या कोषाध्यक्ष सौ. सुनीताराजे पवार, तसेच पुणे कार्यकारिणी सदस्य पद्माकर कुलकर्णी, कल्याणराव शिंदे, सौ. शशिकला पवार, प्राचार्य तानसेन जगताप हेही उपस्थित होते.

या संमेलनास कार्याध्यक्ष विजय पाटील, प्रमुख कार्यवाह गणेश आढाव, कार्यवाह बा. ल. ठाकरे, मा. रामभाऊ शिरोडे (उपाध्यक्ष) यांच्यासोबतच माजी शिक्षक आमदार प्रभाकर संत, सुरेश देशपांडे (डोंबिवली) व कार्य. सदस्यांसह विश्वस्त उ. भ. काळे, डॉ. विनोद केतकर, सुभाष करवा हेही उपस्थित होते.

**शाखा मेळावा :-** मसाप. पुणेचा २०१६ चा शाखा मेळावा दि. १३ नोव्हेंबर २०१६ रोजी हॉटेल अन्नपूर्णा रेसिडेन्सी, चाळीसगाव येथे आयोजित केला होता. मेळाव्याचे उद्घाटन ८९ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष मा. डॉ. श्रीपाल सबनीस यांच्या हस्ते दीपप्रज्वलन करून करण्यात आले. या प्रसंगी मसाप पुणेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, कोषाध्यक्ष सौ. सुनीताराजे पवार, विभागीय संमेलनाचे निमंत्रक पद्माकर कुलकर्णी, विभागीय कार्यवाह प्राचार्य तानसेन जगताप यांच्यासह शाखेच्या विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुनील राजपूत विचारमंचावर उपस्थित होते. सुरुवातीला शाखेचे कार्याध्यक्ष विजय पाटील यांनी उपस्थितांचे स्वागत केले व अध्यक्ष प्राचार्य जगताप यांनी प्रास्ताविक सादर केले. डॉ. सबनीस यांच्या हस्ते शाखेच्या पाच वर्षांच्या अहवालपर कार्यपुस्तिकेचे प्रकाशनही करण्यात आले. आपल्या उद्घाटनपर भाषणात संमेलनाध्यक्षांनी अगदी प्राचीन घडामोडींपासून ते आजच्या ५००-१०००च्या नोटबंदीपर्यंतच्या सामाजिक घटनांचा वैचारिक परामर्श घेतला.

## समीक्षा संमेलन वृत्तान्त- दि. १४/११/२०१६

पाचोरा :- महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांच्या वतीने श्री. शेठ मुरलीधरजी मानसिंग का साहित्य, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, पाचोरा येथे दि. १४/११/२०१६ रोजी समीक्षा संमेलन झाले.

भारतीय साहित्याला प्राचीन परंपरा लाभलेली असून, साहित्यातील कला आणि जीवनमूल्यांची चिकित्सा म्हणजेच समीक्षा. समीक्षा हा मूल्यांचा व्यवहार आहे, असे विचार प्राचार्य डॉ. दिलीप घोंडगे यांनी पाचोरा येथे आयोजित तिसऱ्या समीक्षा संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना मांडले. समीक्षा, मीमांसा, चिकित्सा, साहित्य याविषयी सांगून भारतीय साहित्य समीक्षा पाश्चात्त्य समीक्षा पद्धतीच्या आधारे चालते असे ते म्हणाले.

डॉ. सतीश बडवे यांनी समीक्षा पद्धती, त्याचे उपयोजन, यासोबतच समीक्षेच्या संदर्भात वापरल्या जाणाऱ्या संस्कृत व इंग्रजी संकल्पना याबाबत मार्गदर्शन केले. चांगले समीक्षक निर्माण होण्याची व समीक्षा पद्धतीचा सखोल अभ्यास

करण्याची अपेक्षा व्यक्त केली.

महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे व श्री शेठ मुरलीधरजी मानसिंग का साहित्य, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय पाचोरा यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित 'समीक्षा : पद्धती व उपयोजन' या विषयावरील एकदिवसीय समीक्षा संमेलन दि. १४/११/२०१६ रोजी पार पडले. प्राचार्य डॉ. दिलीप धोंडगे (नाशिक) संमेलनाचे अध्यक्ष होते. विचार मंचावर प्रा. मिलिंद जोशी (पुणे) उपस्थित होते. त्यांच्या हस्ते या समीक्षा संमेलनाचे उद्घाटन झाले. त्या प्रसंगी डॉ. सतीश बडवे (औरंगाबाद), सौ. सुनीताराजे पवार (कोषाध्यक्ष, म.सा.प. पुणे), पद्माकर कुलकर्णी (निमंत्रक, विभागीय साहित्य संमेलन, म.सा.प., पुणे) यांची समायोजित भाषणे झाली.

प्राचार्य डॉ. भी. ना. पाटील यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले, तर डॉ. वासुदेव वले यांनी भूमिकाकथन केले. डॉ. अक्षय घोरपडे यांनी पाहुण्यांचा परिचय करून दिला. विचारमंचावर नानासाहेब व्ही. टी. जोशी, दादासाहेब खलील देशमुख, प्राचार्य डॉ. भी. ना. पाटील, डॉ. वासुदेव वले उपस्थित होते. कु. अपूर्वा परदेशी यांनी स्वागतगीत सादर केले. कार्यक्रमाचे आभार डॉ. वासुदेव वले यांनी मानले. सूत्रसंचालन महेश कौंडिण्य यांनी केले. या प्रसंगी राजेंद्र मुठाणे, वि. दा. पिंगळे, कल्याण शिंदे, डॉ. शशिकला पवार उपस्थित होते.

उद्घाटन सत्रानंतर दुपारच्या सत्रात डॉ. सुभाष सावरकर (अमरावती) यांच्या अध्यक्षतेखाली मान्यवरांनी आपले शोधनिबंध सादर केले. त्यांत डॉ. आशुतोष पाटील यांनी 'समाजशास्त्रीय समीक्षा पद्धती', डॉ. पुष्पा गावीत यांनी 'आदिवासी साहित्यातील सौंदर्य', 'डॉ. ताहिर पठाण (अलिगढ, उ. प्र.) यांनी 'ऐतिहासिक समीक्षा पद्धती', डॉ. अतुल वानखेडे यांनी 'मराठी जनसाहित्य समीक्षा व उपयोजन, तर डॉ. निरंजन माधव यांनी 'जनसाहित्य समीक्षा व व्यंकटेश माडगुळकरांच्या कथेसंदर्भात उपयोजन' या विविध विषयांवर शोधनिबंध सादर केले. डॉ. सुभाष सावरकरांनी अध्यक्षीय समारोप केला. त्यात त्यांनी जनसाहित्य समीक्षेवर प्रकाश टाकला.

- वृत्तसंकलन- **प्रा. संगीता भडगे**, पाचोरा.

---

## शाखा नाशिक रोड : 'वाचन प्रेरणादिन-२०१६' कार्यक्रम वृत्तान्त

भारताचे माजी राष्ट्रपती स्व. महामहिम मा. डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांच्या स्मृती अत्यंत प्रेरणादायी असल्याने त्या भावी पिढ्यांकरिता टिकाव्यात म्हणून महाराष्ट्र शासनाने १५, ऑक्टोबर त्यांचा जन्मदिन हा 'वाचन प्रेरणादिन' म्हणून साजरा करण्याचे ठरविले. गेल्या वर्षी कलामसाहेब आपल्यातून गेल्यानंतरचा हा पहिलाच प्रसंग होता, त्यामुळे पहिल्यापासूनच एक आगळा-वेगळा कार्यक्रम करण्याचे ठरवल्यानंतर शाखेने कार्यक्षेत्रातील सर्व माध्यमिक शाळांतील दहावीच्या शालान्त परीक्षेत मराठी विषयात सर्वाधिक गुण मिळवणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांचा गौरव करण्याचे ठरविले. यंदाच्या वर्षी या उपक्रमाचे दुसरे वर्ष होते.

''मराठी भाषेचा गोडवा समजण्यासाठी प्रत्येकाने ग्रंथ वाचले पाहिजेत, ते अभ्यासले पाहिजेत, त्यावर चिंतन व मनन केले पाहिजे. नुसते टी. व्ही. पाहून किंवा इंटरनेटचा वापर केल्याने भाषा येत नाही, किंबहुना वाचनानेच ज्ञान प्राप्त होते,' असे मत डॉ. गुंजाळांनी मांडले.

शाखा कार्यक्षेत्रातील ४८ विद्यार्थ्यांचा गौरव केला गेला. परिसरातील सर्व विद्यार्थ्यांमध्ये सर्वाधिक गुण मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांच्या शिक्षकांचादेखील गौरव केला गेला. यामध्ये डी. एस. कोठारी कन्याशाळेच्या सौ. जुईली शेरीकर, र. ज. चव्हाण बिंटको गर्ल्स हायस्कूलच्या सौ. कल्पना जाधव आणि देवळाली हायस्कूलच्या सौ. मनीषा सेवलीकर यांचा गौरव करण्यात आला.

कार्यक्रमास नि. प्र. जि. न्यायाधीश प्रकाश कऱ्हाडकर, आयकर अधिकारी अनिल गुरव, आंतरराष्ट्रीय सल्लागार श्रीकांत पाटील, शिक्षणतज्ज्ञ रमेश ओटे, मनमाड येथील व्यावसायिक विजय जैन, मिलिंद घमंडी, श्रीमती आदिती जोशी उपस्थित होते. उद्योजक पांडुरंग चव्हाण यांना कार्यक्रम भावल्याने त्यांनी कार्यक्रमास रु. १,०००/-ची रोख मदत दिली.

---

## 'विनामूल्य संस्कृत संभाषण शिबिर' कार्यक्रमाचा वृत्तान्त

भारतीय उपखंडातील मूळ अभिजात भाषा म्हणून संस्कृत जगन्मान्य आहे. तिचे श्रेष्ठत्व सर्वश्रुत आहे. या मूळ भाषेचे संवर्धन आणि प्रसार करण्यासाठी कार्य करणे हे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे उद्दिष्ट आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिक रोड आणि संस्कृत भारती, नाशिक यांच्या संयुक्त विद्यमाने हे विनामूल्य शिबिर आयोजित केले होते. शिबिरात नवी दिल्ली येथील संस्कृतचे ख्यातनाम शिक्षक अभिनंदन झा यांनी वर्ग घेतले. शिबिर सर्वांसाठी खुले होते.

**उद्घाटन :**

विनामूल्य संस्कृत संभाषण शिबिराचे उद्घाटन दि. २३ सप्टेंबर २०१६ रोजी सकाळी नाशिक रोड महाविद्यालयाचे



अनुक्रमणिका

प्राचार्य ज्येष्ठ साहित्यिक मा. प्रा. डॉ. राम कुलकर्णी यांच्या शुभहस्ते झाले. व्यासपीठावर त्यांच्यासमवेत सौ. मानसी घमंडी आणि अभिनंदन झा उपस्थित होते. शिबिर आयोजित करण्यामागचा हेतू मालुंजकरांनी आपल्या प्रास्ताविकातून मांडला. कार्यक्रमाच्या यशस्वितेसाठी कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, कोषाध्यक्ष सुदाम सातभाई, कार्यकारिणी सदस्य दशरथ लोखंडे, श्रीमती सुशीला गायधनी, सौ. मंगल सातभाई यांनी परिश्रम घेतले.

**समारोप :**

विनामूल्य संस्कृत संभाषण शिबिराचा समारोप शनिवार, दि. २ ऑक्टोबर २०१६ रोजी सकाळी ११ वाजता त्र्यंबकेश्वर तालुक्याचे नायब तहसीलदार मा. राजू कांबळे यांच्या प्रमुख उपस्थितीत झाला. व्यासपीठावर महाराष्ट्र साहित्य परिषदेचे जिल्हा प्रतिनिधी ॲड. नितीन ठाकरे आणि अभिनंदन झा उपस्थित होते. संस्कृत भारतीचे गजानन अंबोरे यांचा प्रस्ताव आणि प्रत्यक्ष आयोजन याविषयी माहिती त्यांनी दिली. सत्काराला उत्तर देताना झा यांनी शिबिरात व्याकरणावर भर देण्याऐवजी भाषेची गोडी निर्माण करण्यावर भर दिल्याचे सांगितले. ''मराठीतील जवळजवळ ६०% शब्द संस्कृत असल्याने आपल्या मातृभाषेचे ज्ञान समृद्ध होईल,'' असे त्यांनी नमूद केले.

शिबिरात श्रीमती सुशीला गायधनी, सौ. मानसी घमंडी, सौ. मंगल सातभाई, ताहेर दाहोदवाला, सुदाम सातभाई, श्रीमती आदिती जोशी, ॲड. नितीन धात्रक, नितीन कोंद्रे, सोमनाथ कासट, मयूर मते, श्रीमती प्रमिला कावळे आणि ज्ञानेश्वर नवगिरे यांनी भाग घेतला. शिबिरार्थींना प्रमुख अतिथींच्या हस्ते 'प्रमाणपत्र' देऊन त्यांचा सत्कार करण्यात आला.

**- रवींद्र मालुंजकर**, कार्यवाह

---

## सोलापूर (मुख्य) शाखेचा कार्यवृत्तान्त

सन २०१६-२०२१ या कालावधीसाठी महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोलापूर (मुख्य)ची निवडणूक प्रक्रिया ३ एप्रिल २०१६ रोजी डॉ. निर्मलकुमार फडकुले सभागृहात पार पडली. शाखेच्या अध्यक्षपदी डॉ. सुहास पुजारी यांची बिनविरोध निवड झाली.

निवड झालेले नूतन पदाधिकारी पुढीलप्रमाणे- उपाध्यक्ष- दत्ता सुरवसे, कार्याध्यक्ष- ॲड. जे. जे. कुलकर्णी, प्रमुख कार्यवाह- बाबूराव मैंदर्गीकर, कार्यवाह- मारुती कटकधोंड, कोषाध्यक्ष- बदीउज्जमा बिराजदार, प्रसिद्धि प्रमुख- राजेंद्र भोसले, युवा मंच प्रमुख- प्रा. नरेंद्र काटीकर, महिला मंच प्रमुख - डॉ. श्रुती वडगबाळकर अशी पदाधिकाऱ्यांची बिनविरोध निवड झाली. या वेळी कार्यकारिणीचे सदस्य किशोर चंडक, पद्माकर कुलकर्णी, निर्मला मठपती, ॲड. रेवणसिद्ध पाटील, राजेंद्र कोठावळे व डॉ. संजय लांडगे उपस्थित होते. या वेळी कवी माधव पवार व वंदना कुलकर्णी यांची स्वीकृत सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात आली. निवडणूक निर्णय अधिकारी म्हणून ॲड. पांडुरंग देशमुख यांनी काम पाहिले.

डॉ. इरेश स्वामी यांच्या 'बसवबोध'चे प्रकाशन

महाराष्ट्र साहित्य परिषद व आंतरराष्ट्रीय प्रार्थना योग मंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने सोलापूर विद्यापीठाचे प्रथम कुलगुरू डॉ. इरेश स्वामी यांच्या 'बसवबोध' या ग्रंथाचे प्रकाशन १ जुलै २०१६ रोजी माजी केंद्रीय गृहमंत्री सुशीलकुमार शिंदे यांच्या हस्ते डॉ. फडकुले सभागृहात पार पडले. सोलापूर विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. एन. एन. मालदार हे अध्यक्षस्थानी होते. या ग्रंथात संत बसवेश्वरांच्या कन्नड वचनांचा मराठी भाषेत अनुवाद व स्पष्टीकरण देण्यात आलेले आहे.

या वेळी मंचावर किरीटेश्वर मठाचे मठाधिपती स्वामिनाथ महास्वामीजी, नीलकंठ कोनापुरे, राजेंद्र मायनाळे, बाबासाहेब कुलकर्णी उपस्थित होते. आभार मसापचे कार्याध्यक्ष ॲड. जे. जे. कुलकर्णी यांनी मानले. सूत्रसंचालन भगवान आदटराव यांनी केले. या वेळी साहित्यरसिकांची लक्षणीय उपस्थिती होती.

**वार्षिक सर्वसाधारण सभा :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोलापूर (मुख्य)ची वार्षिक सर्वसाधारण सभा ३१ जुलै २०१६ रोजी डॉ. निर्मलकुमार फडकुले सभागृह येथे खेळीमेळीच्या वातावरणात झाली.

**बहुभाषिक कविसंमेलन**

मसाप, सोलापूर शाखा व संगमेश्वर कॉलेज, भाषा व संस्कृती मंडळ, सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने बहुभाषा कविसंमेलनाचे आयोजन दिनांक २२/८/२०१६ रोजी संगमेश्वर कॉलेज येथे करण्यात आले.

या कविसंमेलनात कवी नारायण कुलकर्णी यांनी मराठी भाषेतून, कवी जाफर महम्मद जाफर व कवी मीर अफजल दौलताबादकर यांनी हिंदीतून व कवी बी. बी. पुजारी यांनी कन्नडमधून आपल्या विविध विषयांच्या कविता सादर करून उपस्थित विद्यार्थ्यांना मंत्रमुग्ध केले.

**युवा शाखेच्या कविसंमेलनास उत्स्फूर्त प्रतिसाद :**

सोलापूर - २८ : महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा- सोलापूर (मुख्य)अंतर्गत युवा शाखेतर्फे जिल्ह्यातील महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी आयोजित केलेल्या 'श्रावणधारा' या काव्यस्पर्धेस जिल्ह्यातील एकूण ३६३ युवक-युवतींनी

उत्स्फूर्त सहभाग नोंदवला. 'श्रावण', 'पाऊस' व 'माझा देश' हे तीन विषय या काव्यस्पर्धेसाठी होते. पाच गटांत ही स्पर्धा झाली.

मंगळवेढेकर इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट, सोलापूर येथे संपन्न झालेल्या या स्पर्धेचे उद्घाटन काव्यज्योत प्रज्वलित करून मनपाचे उपायुक्त श्रीकांत मायकनवार यांच्या हस्ते झाले.

**-राजेंद्र भोसले,** प्रसिद्धी प्रमुख, शाखा सोलापूर

**तिमाही वृत्तान्त : ऑक्टोबर, नोव्हेंबर, डिसेंबर २०१६**

१) म.सा.प. शाखा सोलापूर दरमहा साहित्यविषयक कार्यक्रम आयोजित करत असते. त्याअंतर्गत सप्टेंबर महिन्यात महाविद्यालयीन विद्यार्थ्यांकरता काव्यलेखन स्पर्धा श्रावणधारा आयोजित करण्यात आली होती. जिल्ह्यातील महाविद्यालयातील सुमारे ३५० विद्यार्थ्यांनी या स्पर्धेत भाग घेतला होता. या स्पर्धेचा बक्षीस समारंभ ४ ऑक्टोबर २०१६ रोजी संपन्न झाला. या स्पर्धेचे उत्कृष्ट आयोजन युवा विभागप्रमुख प्रो. नरेंद्र काटीकर, कार्यवाह मारुती कटकधोंड व इतर कार्यकारिणी सदस्यांनी केले होते.

२) म.सा.प. शाखा सोलापूर शाखेचा ४ ऑक्टोबर २०१६ रोजीचा वर्धापनदिनाचा, अमृतमहोत्सव वर्षाचा शुभारंभ कार्यक्रम दिनांक १५ ऑक्टोबर २०१६ रोजी मा. सुशीलकुमार शिंदे, (माजी गृहमंत्री) यांच्या अध्यक्षतेखाली व प्रमुख पाहुणे मा. डॉ. पी. डी. पाटील, (कुलगुरू, डॉ. डी. वाय. पाटील अभिमत विद्यापीठ) यांच्या उपस्थितीत झाला. त्या निमित्ताने माजी अध्यक्षांचा सत्कार करण्यात आला. तसेच म.सा.प. शाखा सोलापूरचे वेबसाइटचे उद्घाटन मा. सुशीलकुमार शिंदे व मा.डॉ. पी. डी. पाटील यांच्या हस्ते करण्यात आजे. या संकेतस्थळाच्या निर्मितीसाठी सदस्य प्रा. डॉ. नरेंद्र काटीकर यांच्या विद्यार्थ्यांनी विशेष परिश्रम घेतले. श्री. शिंदे आणि श्री. पाटील या दोघांनीही शाखेच्या आजवरच्या वाटचालीचे व कार्याचे कौतुक अभिनंदन करून शुभेच्छा दिल्या. अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त व पुढील कार्याकरिता मा. डॉ. पी. डी. पाटील यांनी म.सा.प. सोलापूर शाखेस पाच लाख रुपयांचे भरघोस योगदान दिले. अमृतमहोत्सवी वर्षाचा शुभारंभ सोहळा दिमाखात पार पडला.

३) २६ नोव्हेंबर रोजी सातारा येथील नाट्य कलावंत व आचार्य अत्रेप्रेमी प्रसाद चाफेकर यांनी 'आचार्य अत्रे यांची नाटके व विनोद' या विषयावर माहितीपूर्ण व्याख्यान दिले.

४) दिनांक १७, १८, १९ डिसेंबर रोजी प्रतिवर्षाप्रमाणे म.सा.प. शाखा आयोजित शेठ लोणकरणजी जगन्नाथ चंडक स्मृती व्याख्यानमाला झाली. या व्याख्यानमालेत डॉ. अक्षयकुमार काळे यांचे 'गालिब आणि त्यांची गझल', ज्येष्ठ पत्रकार, लेखक, समीक्षक, व्याख्याते यमाजी मालकर यांचे 'अर्थक्रांतीकडून अर्थशांतीकडे' या विषयावर आणि मुंबई येथील एशियाटिक सोसायटीच्या उपाध्यक्षा डॉ. सौ. मीना वैशंपायन यांचे 'दुर्गाबाई भागवत आणि त्यांचे वाङ्मय' या विषयावर व्याख्याने झाली. व्याख्यानमालेचे यंदाचे २० वे वर्ष होते.

**- ॲड. जे. जे. कुलकर्णी**
कार्याध्यक्ष, शाखा सोलापूर

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, जुळे सोलापूर शाखा

**१. दि. ११/६/२०१६ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, जुळे सोलापूर शाखेने आयोजित केलेल्या, श्री. रामकिसनजी शुभकरणजी फोफालिया यांच्या स्मरणार्थ राज्यस्तरीय दिवाळी अंक स्पर्धा २०१५चा पुरस्कार वितरण सोहळा हिराचंद नेमचंद वाचनालयाच्या ॲम्फी थिएटरमध्ये ११ जून २०१६ रोजी मा. मिलिंद जोशी यांच्या शुभहस्ते, मा. प्रकाश पायगुडे यांच्या अध्यक्षतेखाली, सौ. सुनीताराजे पवार यांच्या प्रमुख उपस्थितीत झाला. साहित्य चपराक, चतुरंग अन्वय, संवाद, किशोर, हास्यधमाल, स्पर्शज्ञान, संस्कृती, लोकमत, लोकमंगल मैत्र, तसेच शब्दालय या दिवाळी अंकांना पुरस्कार दिले गेले.

**२. दि. १५/६/२०१६ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूरची पंचवार्षिक निवडणूक सन २०१६ ते सन २०२१ बिनविरोध झाली. पंधरा जागांसाठी सोळा अर्ज आले. निवडणूक अधिकारी मा. दामोदर पानगावकर यांनी एक अर्ज अवैध ठरविल्याने १५ जागांसाठी १५ अर्जच राहिले. त्यानंतर मावळते अध्यक्ष डॉ. वासुदेव रायते यांच्या अध्यक्षतेखाली पदाधिकारी निवडले गेले.

अध्यक्ष - पद्माकर कुलकर्णी, उपाध्यक्ष - प्रशांत जोशी, कार्याध्यक्ष - सायली जोशी, प्रमुख कार्यवाह - गिरीश दुनाखे, कार्यवाह - संदीप कुलकर्णी, कोषाध्यक्ष - जयंत रायते. या वेळी डॉ. वासुदेव रायते, नारायण कुलकर्णी, प्रा. ए. डी. जोशी यांची सल्लागार म्हणून निवड करण्यात आली. श्रीकांत कुलकर्णी, शांता क्षीरसागर, अमित कामतकर, सचिन चौधरी, पृथा हलसगीकर, अचला टाचर्ला, अनिता कुलकर्णी, अर्पिता खडकीकर आणि शिवकन्या कोंजारी यांची कार्यकारिणी सदस्य म्हणून निवड झाली.

**३. दि. २१/६/२०१६ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, जुळे सोलापूर शाखा आणि अक्षरधारा प्रकाशन, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने निमंत्रित कवींचे कविसंमेलन शुभराम आर्ट गॅलरीत मंगळवार दि. २१/६/२०१६ रोजी आयोजित केले होते. ज्येष्ठ कवी माधव पवार यांच्या उत्कृष्ट सूत्रसंचालनामध्ये रंगलेल्या या कविसंमेलनात मारुती कटकधोंड, गिरीश दुनाखे, वंदना कुलकर्णी, पुरुषोत्तम नगरकर,

निर्मला मठपती, शांताबाई क्षीरसागर, राजश्री जाधव आणि देवेंद्र औटी या कवींनी पावसाच्या एकापेक्षा एक सरस कविता सादर करून श्रोत्यांना मंत्रमुग्ध केले.

**४. दि. १२/७/२०१६ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, जुळे सोलापूर शाखेतर्फे सोलापूर आकाशवाणी केंद्राचे कार्यक्रम अधिकारी मा. सुनील शिनखेडे यांना 'सहायक केंद्र संचालक' म्हणून बढती मिळाल्याबद्दल त्यांचा सत्कार करण्यात आला.

**५ :** महाराष्ट्र साहित्य परिषद, जुळे सोलापूर शाखेच्या कार्यकारिणी मीटींगमध्ये प्रॉ. रा. ग. जाधव, वीणा सहस्त्रबुद्धे, महाश्वेतादेवी, वसुंधरा पेंडसे-नाईक, अरुण टिकेकर, तसेच सदस्यांचे दिवंगत नातेवाईक आणि म. सा. प. पुणेचे वरिष्ठ कर्मचारी चंद्रशेखर केळकर यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**६. दि. १५/७/२०१६ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, जुळे सोलापूर यांच्या 'मसाप कॉलेजमधील 'लेखक विद्यार्थ्यांच्या भेटीला' या उपक्रमांतर्गत मसाप जुळे सोलापूर व संगमेश्वर महाविद्यालय भाषा, आणि साहित्य संस्कृती मंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने महाकवी कालिदासदिनाचे औचित्य साधून 'महाकवी कालिदास' या विषयावर मा. डॉ. लक्ष्मीनारायण बोल्ली यांचे व्याख्यान आयोजित केले होते. संगमेश्वर महाविद्यालयातील या कार्यक्रमात कार्यकारिणी सदस्य अमित कामतकर यांनी मसाप जुळे सोलापूर आणि तिच्या उपक्रमाविषयी माहिती दिली. या वेळी प्राचार्य डी. डी. पुजारी, डॉ. सुहास पुजारी, कार्याध्यक्षा सौ. सायली जोशी, अध्यक्ष मा. पद्माकर कुलकर्णी, संदीप कुलकर्णी, श्रीकांत कुलकर्णी, अनिता कुलकर्णी, उपाध्यक्ष प्रशांत जोशी यांच्यासह संगमेश्वर कॉलेजचे विद्यार्थी आणि मराठी विभागाचे प्राध्यापक उपस्थित होते.

**७. दि. २४/८/२०१६ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, जुळे सोलापूर शाखेचा पाचवा वर्धापनदिन दिनांक २४/८/२०१६ रोजी संध्या. ६ वाजता जुळे सोलापुरातील इंडियन मॉडेल स्कूलच्या सभागृहात सो. म. पा. आयुक्त विजय काळम पाटील यांच्या प्रमुख उपस्थितीत, तसेच म. सा. प. पुणेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह म. सा. प. पुणे प्रकाश पायगुडे यांच्या उपस्थितीत साजरा करण्यात आला. या वेळी सो. म. पा.च्या कर्तव्यदक्ष अधिकारी सौ. सारिका आकुलवार यांना सौ. सुनेत्रा श्रीनिवास कुमठेकर स्मृती पुरस्कार मान्यवरांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. तसेच राष्ट्रपती पदकविजेते संजय हुंडेकरी, डॉ. वासुदेव रायते, नारायणकाका कुलकर्णी यांचा सत्कार करण्यात आला. या समारंभात भगिनी समाज संस्थेतर्फे, म.सा.प. जुळे सोलापूरचे उत्तम काम पाहून त्यांनी एक हजार पुस्तके व कपाट भेट दिले. या कार्यक्रमाचे औचित्य साधून प्रा. मिलिंद जोशी यांचे 'जीवनातील विनोदाचे स्थान' या विषयावर व्याख्यान झाले. या कार्यक्रमात मसाप जुळे सोलापूरच्या वेबसाइटचे नूतनीकरण मान्यवरांच्या हस्ते झाले. पाहुण्यांचे स्वागत कार्याध्यक्षा सौ. सायली जोशी, यांनी तर प्रास्ताविक अध्यक्ष पद्माकर कुलकर्णी यांनी केले.

**८ :** म. सा. प. जुळे सोलापूर शाखेचे सन्माननीय सदस्य अमोल जोशी आणि त्यांच्या पत्नी कार्याध्यक्षा सौ. सायली जोशी यांनी झी वाहिनीवरील मराठी मालिका 'खुलता कळी खुलेना'चे सहनिर्माते म्हणून निर्मिती क्षेत्रात धाडसाने पाऊल टाकले असून मराठी भाषेच्या संवर्धनासाठी ते धडाडीने काम करणार आहेत. म. सा. प. जुळे सोलापूर शाखेच्या वर्धापनदिनाचे औचित्य साधून उभयतांचा प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते यथोचित जाहीर सत्कार करून गौरवण्यात आले.

**- गिरीश दुनाखे**, प्रमुख कार्यवाह

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा पंढरपूर

**सभासद स्नेहमेळावा व कविसंमेलन :**

पंढरपूर शाखेच्या सभासदांचा स्नेहमेळावा व कविसंमेलन सप्टेंबर महिन्यात आयोजित करण्यात आले होते. कार्यक्रमामधे म.सा.प. जिल्हा प्रतिनिधी पद्माकर कुलकर्णी, ॲड. जे.जे. कुलकर्णी, कल्याणराव शिंदे यांचा सत्कार करण्यत आला. या कार्यक्रमात मंगळवेढ्याचे कवी इंद्रजित घुले व शिवाजी सातपुते यांनी कविता सादर करून श्रोत्यांना मंत्रमुग्ध केले. कार्यक्रमासाठी ज्येष्ठ साहित्यिक डॉ. द. ता. भोसले, मा. वा. ना. उत्पात, नानासाहेब रत्नपारखी वगैरे अनेक मान्यवर मंडळी उपस्थित होती.

**पंढरपूर येथे म.सा.प. कार्याध्यक्ष मिलिंद जोशी यांचे म.सा.प. शाखा पंढरपूरच्या वतीने व्याख्यान –**

पंढरपूर शाखेच्या वतीने प्रा. मिलिंद जोशी यांचे 'वाचनसंस्कृती' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. सदर कार्यक्रमात प्रा. मिलिंद जोशी, कार्यवाह प्रकाश पायगुडे यांचा सत्कार करण्यात आला. या वेळी नानासाहेब रत्नपारखी, डॉ. द. ता. भोसले, ह.भ.प. वा. ना. उत्पात, प्रा. वामनराव भाळवकर उपस्थित होते.

**म.सा. शाखा पंढरपूर व कर्मवीर भाऊराव पाटील महाविद्यालयाचा एम. ओ. यू. सामंजस्य करार :**

पंढरपूर शाखेच्या वतीने कर्मवीर भाऊराव पाटील महाविद्यालयाशी एम. ओ. यू. सामंजस्य करार करण्यात आला. या वेळी प्रा. डॉ. जे. बी. जाधव व जिल्हा प्रतिनिधी कल्याणराव शिंदे यांच्या सहीने सामंजस्य करार करण्यात आला. दोन्ही संस्थांच्या वतीने व्याख्याने, चर्चासत्रे, कविसंमेलन या स्पर्धांचे आयोजन करण्यात येणार आहे. या वेळी प्रा. डॉ. देवानंद सोनटक्के व राजाराम राठोड, प्रा. डॉ. चांगदेव कांबळे, प्रा. बागल उपस्थित होते.

## महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे जिल्हा

१) महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे जिल्हा तर्फे दिनांक २३ सप्टेंबर २०१६ रोजी मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी मराठी अभ्यासकांची बैठक व चर्चा आयोजित करण्यात आली. सदर कार्यक्रमात डॉ. रामचंद्र देखणे अध्यक्षस्थानी होते. सामाजिक कार्यकर्ते गिरीश प्रभुणे, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाचे मराठी विभागप्रमुख डॉ. अविनाश सांगे, ज्येष्ठ पत्रकार सुरेश साखवळकर, मराठी भाषा संवर्धन समिती पिं.चिं.चे सदस्य अरुण बोऱ्हाडे, प्रा. राजेन्द्र कांकरिया यांनी चर्चेत भाग घेऊन अभ्यासकांसमोर आपले विचार मांडले. सभेस पुणे जिल्ह्यातील ५६ प्राध्यापक सहभागी झाले होते. पुनरुत्थान समरसता गुरुकुलम् या संस्थेला राजन लाखे यांनी ५००१ रुपयांची देणगी जाहीर करून ती गिरीश प्रभुणे यांच्याकडे सुपूर्त केली.

२) दिनांक १५ ऑक्टोबर २०१६ रोजी म.सा.प. पुणे जिल्हातर्फे भारताचे माजी राष्ट्रपती डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम यांच्या जयंतीनिमित्त 'वाचनप्रेरणा दिन' साजरा करण्यात आला. सदर कार्यक्रमास नगरसेविका सौ. सुलभाताई उबाळे व जयहिंद बँकेचे चेअरमन धनाजी विनोदे हे प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते.

३) मराठी साहित्य व कला मंडळ व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे जिल्हा यांच्या संयुक्त विद्यमाने दिनांक ६ नोव्हेंबर २०१६ रोजी काव्यपहाट 'काव्य रंगे उषःकाल संगे' या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले होते. सदर कार्यक्रमास खासदास अमर साबळे, प्रसिद्ध कवी-लेखक प्रवीण दवणे, चित्रपट निर्माते मच्छिंद्र धुमाळ, सतीश फुगे, अनमोल प्रकाशनचे संचालक नरेंद्र नांदुरकर, मकरंद बापट उपस्थित होते. सदर कार्यक्रमात 'साहित्यरंग' या विशेषांकाचे लोकार्पण करण्यात आले. डॉ. मीनल लाड व डॉ. श्रीकृष्ण जोशी यांनी साहित्यिक प्रश्नमंजुषा घेतली. संजय जगताप व प्रकाश निर्मळ यांनी कविसंमेलनाचे सुत्रसंचालन केले. रघुनाथ पाटील, दत्तू ठोकळे यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले. कविसंमेलनातील तीन उत्कृष्ट कवितांची निवड करून कवींना पारितोषिक देण्यात आले. चित्रकार चिंतामणी मनोहर यांनी पाहुण्यांच्या रेखाटलेल्या चित्राबद्दल सत्कार करण्यात आला.

४) दिनांक २३ नोव्हेंबर २०१६ रोजी म.सा.प. पुणे जिल्ह्याच्या वतीने 'मिर्झा गालिब व त्यांची गजल' ह्या विषयावर व्याख्यान डॉ. अक्षयकुमार काळे यांचे आयोजित करण्यात आले. मिर्झा गालिबच्या संघर्षमय जीवनात शेरो शायरी व गजलनिर्मितीमधे त्यांनी तृप्तीपेक्षा तृष्णेला दिलेले महत्त्व अभ्यासपूर्ण विशद केले आणि साहित्यिक व रसिकांना गजलेच्या विश्वात नेऊन रममाण केले. सदर कार्यक्रमास मसाप पत्रिका संपादक डॉ. पुरुषोत्तम काळे, नगरसेवक अमृत पऱ्हाड, उद्योगपती विजय लोटके उपस्थित होते. जिल्हा प्रतिनिधी राजन लाखे यांनी प्रास्ताविक केले. दिगंबर शिंदे यांनी सूत्रसंचालन केले तर अश्विनी रानडे यांनी आभार मानले.

- राजन लाखे, पुणे जिल्हा प्रतिनिधी, म.सा.प. पुणे

---

## आलेगाव व पागा (शिरूर) शाखा कार्यवृत्त

**आलेगाव व पागा (शिरूर) शाखेचा उद्घाटन समारंभ**

नवोदित लेखकांनी वास्तववादी परिस्थितीचे भान ठेवून समाजाचे परिवर्तन होईल असे दर्जेदार साहित्य निर्माण करणे ही काळाची गरज आहे, असे मत प्रसिद्ध साहित्यिक व संत साहित्याचे गाढे अभ्यासक डॉ. रामचंद्र देखणे यांनी मांडले.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या (पुणे) आलेगाव पागा शाखेच्या उद्घाटनप्रसंगी महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, कोषाध्यक्ष मा. सुनीताराजे पवार जिल्हा प्रतिनिधी मा. राजन लाखे, शिरूर तालुक्याचे माजी आमदार सूर्यकांतकाका पलांडे, आलेगाव शाखेचे कार्याध्यक्ष प्रा. भाऊसाहेब भोसले, उद्योगपती प्रकाश कुतवळ, रवींद्र धनक इ. मान्यवर उपस्थित होते. सुत्रसंचालन संजय बारवकर यांनी केले.

---

## 'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, डोंबिवली शाखा

'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, डोंबिवली शाखेच्या नुकत्याच झालेल्या वार्षिक सर्वसाधारण सभेत २०१६-२१२१ या कार्यकाळासाठी संतसाहित्याचे गाढे अभ्यासक आणि ज्येष्ठ साहित्यिक वामनराव देशपांडे याची अध्यक्षपदी निवड झाली. अन्य कार्यकारिणी पुढीलप्रमाणे : १. सौ. स्मिता तळेकर (उपाध्यक्ष), २. श्री. सुरेश देशपांडे (कार्याध्यक्ष), ३. डॉ. धनश्री साने (सचिव), ४. सौ. गीता नवरे (सहसचिव), ५. श्री. विनय मणेरीकर (खजिनदार), ६. श्री. नारायण लाळे (सदस्य), ७. प्रा. शुक्राचार्य गायकवाड (सदस्य), ८. श्री. आनंद गोसावी (सदस्य), ९. श्री. विनायक जोशी (सदस्य), १०. श्री. सुधीर बर्डे (सदस्य), ११. श्री. मधुकर भागवत (सदस्य), १२. डॉ. वृंदा कौजलगीकर (सदस्य), १३. सौ. प्रज्ञा जोशी (सदस्य), १४. सौ. स्वाती पारखे (सदस्य).



अनुक्रमणिका

## सावेडी शाखा कार्यवृत्त

म.सा.प., सावेडी (जि. नगर) आणि शांतिकुमारजी फिरोदिया मेमोरियल फौंडेशन आयोजित विविध साहित्य पुरस्कार वितरण सोहळा दि. ३० ऑगस्ट २०१६ रोजी झाला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी ८८व्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्रीपाल सबनीस होते. या प्रसंगी 'मराठी भाषेचे विद्यापीठ होण्यासाठी सर्व साहित्यिकांनी एकत्रित प्रयत्न करणे आवश्यक आहे', असे आग्रही प्रतिपादन श्रीपाल सबनीस यांनी केले. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी सावेडी म.सा.प. शाखेच्या उपक्रमाचे कौतुक केले कार्यक्रमाचे प्रास्ताविक प्रमुख कार्यवाह जयंत येलुलकर यांनी केली. कार्यक्रमास म.सा.प. पुणेचे विभागीय कार्यवाह प्राचार्य तानसेन जगताप, ज्येष्ठ कवी चंद्रकांत पालवे, अनुवादक विलास गिते आणि भालचंद्र वालटे यांची प्रमुख उपस्थिती होती. आभार प्रदर्शन म.सा.प. सावेडी शाखेचे उपाध्यक्ष सदानंद भणगे यांनी केले. कार्यक्रमाच्या यशस्वी आयोजनासाठी सौ. स्नेहल उपाध्ये, संकेत होशिंग, नंदकिशोर आढाव, दिपाली देऊतकर, सुरेश चव्हाण, अनघा अत्रे, शारदा होशिंग यांनी परिश्रम घेतले.

---

## म.सा.प. शाखा, नांदगाव, ता. नांदगाव, जि. नाशिक

**रविवार, दि. १७ जुलै २०१६ :**

येथील म. सा. प. सदस्य कवी काशिनाथ गवळी यांच्या 'बाप बळीचिया बळे' व 'जाणीवगर्भ' या दोन काव्यसंग्रहांचे प्रकाशन येथील म. सा. प. शाखा नांदगावच्या वतीने झाले. 'बाप बळीचिया बळे' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन 'कादवा शिवार'चे संपादक कवी विजयकुमार मिठे यांच्या शुभहस्ते, तर 'जाणीवगर्भ' या काव्यसंग्रहाचे प्रकाशन महाराष्ट्राचे प्रसिद्ध कवी अरुण म्हात्रे यांच्या शुभहस्ते करण्यात आले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक म. सा. प. शाखेचे अध्यक्ष दयाराम गिलाणकर यांनी केले. शेतकऱ्यांच्या व्यथा, वेदना व दुःख मांडण्याची ताकद कवी काशिनाथ गवळी यांच्या कवितेत आहे व पुढील काळात कवींनी अधिक सकस कविता लिहावी, अशी अपेक्षा कविवर्य अरुणजी म्हात्रे यांनी व्यक्त केली.

तसेच कवी डॉ. मधुकर कवडे, कवी दयाराम गिलाणकर, लेखक प्रा. सुरेश नारायणे या म. सा. प.च्या मान्यवर कवींचे साहित्य प्रकाशित झाले आहे. पाहुण्यांच्या हस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला. या प्रसंगी कविवर्य विजयकुमार मिठे, विलास पगार, सिद्धी प्रकाशनचे प्रकाशक संदीप देशपांडे, चित्रकार विष्णू थोरे, प्रशांत केंदळे आदींनी मनोगत व्यक्त केले व शुभेच्छा दिल्या. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी मा. वसंतराव मवाळ हे होते.

- **प्रा. सुरेश नारायणे**, खजिनदार
मसाप, नांदगाव शाखा

**काशिनाथ गवळी यांच्या कवितासंग्रहाचे नांदगावात प्रकाशन**

कवींनी अधिक सजग होऊन कविता अनेकांच्या ओठांवर कशी येईल, ती कमीत कमी शब्दांत परिणामकारक कशी होईल याकडे लक्ष केंद्रित करावे असे आवाहन प्रसिद्ध कवी व गीतकार अरुण म्हात्रे यांनी केले.

दुष्काळग्रस्त शेतकऱ्याच्या कथा आणि व्यथा, तसेच त्याचे आंतरिक दुःख कवितेतून मांडण्याची ताकद कवी काशिनाथ गवळी यांच्या कवितेत असल्याबद्दल समाधान व्यक्त केले.

---

## फलटण शाखा कार्यवृत्त

स्व. यशवंतराव चव्हाण स्मृतिदिनानिमित्त येथील श्रीराम एज्युकेशन सोसायटी, यशवंतराव चव्हाण स्मृती प्रतिष्ठान, सद्‌गुरू प्रतिष्ठान, महाराष्ट्र साहित्य परिषद फलटण शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित पाचव्या यशवंतराव चव्हाण मराठी साहित्य संमेलनात अध्यक्षस्थानावरून डॉ. यशवंत पाटणे होते. या वेळी व्यासपीठावर संमेलनाचे उद्घाटक माजी आमदार उल्हासदादा पवार, म.सा.प.सातारा जिल्हा प्रतिनिधी रविंद्र बेडकिहाळ, श्रीराम एज्युकेशन सोसायटीचे उपाध्यक्ष बापूसाहेब मोदी, यशवंतराव चव्हाण स्मृती प्रतिष्ठानचे चंद्रकांत जगताप, म.सा.प.फलटण शाखा अध्यक्ष प्राचार्य रवींद्र येवले आदी मान्यवर उपस्थित होते.

डॉ. पाटणे म्हणाले, लोकशाहीमध्ये लोकभावना महत्त्वाच्या असतात. स्वातंत्र्य, समता, बंधुता, सामाजिक न्याय या तत्त्वावर आधारित समाजव्यवस्था निर्माण झाली तरच लोकशाही बळकट होते. साहित्य आणि राजकारण ही दोन वेगवेगळी क्षेत्रे असली तरी लोकहित हेच दोन्हीचे उद्दिष्ट आहे. राजकारणी लोक मत मागतात तर साहित्यिक मत मांडतात.

उल्हासदादा पवार म्हणाले, की त्यांच्या मनात सामान्य

माणसांबद्दल प्रामाणिक भावना होती. साहित्य, कला, संस्कृती व लोकशाहीचे ते उपासक होते. यशवंतविचार समाजाला तारक असून, हे विचार समाजाला देण्याचे काम या साहित्य संमेलनातून होत असते. उल्हासदादा पवार यांनी यशवंतराव चव्हाणांसोबतच्या अनेक आठवणींना उजाळा दिला.

मसाप फलटण शाखेतर्फे देण्यात येणारा 'यशवंतराव चव्हाण साहित्यिक गौरव पुरस्कार' फलटण येथील ज्येष्ठ लेखक व कादंबरीकार रंगोपंत दाते यांना प्रदान करण्यात आला. तर 'यशवंतराव चव्हाण सहकार गौरव पुरस्कार' ज्ञानदीप क्रेडिट को-ऑप. सेवा सोसायटी, मुंबईचे संस्थापक अध्यक्ष विश्वनाथ पवार यांना प्रदान करण्यात आला.

पुरस्काराला उत्तर देताना विश्वनाथ पवार म्हणाले, ग्रामीण जीवनाचा सहकाराच्या माध्यमातून कायापालट करण्यासाठी सहकारी चळवळीला योग्य दिशा देणाऱ्या संस्काराची पेरणी करण्याचे काम साहित्य परिषद करीत आहे.

संमेलनाच्या दुसऱ्या सत्रात 'आठवणीतील कविता' हा कार्यक्रम पार पडला. यामध्ये प्रसिद्ध कवींच्या गाजलेल्या निवडक कवितांचे सादरीकरण रविंद्र जंगम, प्रा.प्रभाकर पवार, ताराचंद्र आवळे, प्रा.विक्रम आपटे, प्राचार्य रवींद्र येवले, निकिता रसाळ यांनी केले. इ. ८ वीतील विद्यार्थिनी कोमल लाला पवार हिच्या स्वरचित 'अहो बाबा' या कवितेने सर्वांचीच मने जिंकली. त्यानंतर प्रसिद्ध कथाकथनकार प्रा. रवींद्र कोकरे (फलटण), हिम्मत पाटील (सांगली) यांचे कथाकथन झाले. त्याला श्रोत्यांनी भरघोस दाद दिली. मसाप फलटण शाखेच्या वतीने शालेय विद्यार्थ्यांसाठी आयोजित केलेल्या तालुकास्तरीय निबंध व हस्ताक्षर स्पर्धेचे पारितोषिक वितरण या वेळी मान्यवरांच्या हस्ते करण्यात आले.

साहित्याप्रमाणे समाजमन घडवणाऱ्या फलटणमध्ये झालेल्या भव्य ज्ञानेश्वरी पारायण सोहळ्याचे मार्गदर्शक ह.भ.प. जाधव महाराज, बबनराव निकम यांचा प्रतिनिधीक, तसेच फलटण शहरातील सर्व पुतळे दररोज स्वत: धुवून स्वच्छ करणारे समाजसेवक बंडू अहिवळे यांचा सत्कार करण्यात आला.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, कल्याण शाखा

**दिनांक २२/०७/२०१६ :**

**महाराष्ट्र साहित्य परिषद शाखेतर्फे वि. आ. बुवा जन्मदिवस साजरा :** महाराष्ट्र साहित्य परिषद कल्याण शाखा आणि सार्वजनिक वाचनालय, कल्याण यांच्या संयुक्त विद्यमाने महाराष्ट्राचे लाडके विनोदी लेखक, कल्याणभूषण के. वि. आ. बुवा यांचा जन्मदिवस दि. ४ जुलै २०१६ रोजी सार्वजनिक वाचनालय कल्याणच्या सभागृहामध्ये झाला. या प्रसंगी प्रमुख पाहुणे म्हणून इतिहास संशोधक मंडळ कल्याणचे अध्यक्ष प्रा. जितेंद्र भामरे हे उपस्थित होते.

प्रसंगी बुवांच्या अनेक चाहत्यांनी त्यांच्या आठवणींना उजाळा दिला, तर तरुणांनी बुवांच्या विनोदी कथांचे वाचन केले. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कल्याण शाखा कार्याध्यक्ष भिकू बारस्कर यांनी वि. आ. बुवांचे उचित स्मारक कल्याणमध्ये व्हावे अशी मागणी केली. या वेळी सार्वजनिक वाचनालय कल्याणचे अध्यक्ष राजीव जोशी, ज्येष्ठ लेखक व महाराष्ट्र साहित्य परिषद, कल्याण शाखेचे अध्यक्ष जनार्दन ओक यांनी आपले विचार मांडले. सूत्रसंचालन सौ. वंदना सहस्रबुद्धे यांनी केले.

कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी कार्यवाहक सौ. आशा जोशी, माधव डोळे, किरण जोगळेकर यांनी मेहनत घेतली.

**- आशा जोशी**, कार्यवाह

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पाटण शाखा

महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, शाखा पाटण व बाळासाहेब देसाई कॉलेज, पाटण यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त त्यांच्या विचारस्मृतीस समर्पित विभागीय मराठी साहित्य संमेलन अहवाल

दिनांक ०८ व ०९ ऑक्टोबर २०१६ ( फुले, शाहू, आंबेडकर नगरीतून )

**ग्रंथ दिंडी**

ऐतिहासिक, सांस्कृतिक, सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक दर्शन घडवत अन् साहित्य वाचनाच्या नव्या जाणिवांची पेरणी करत पाटण येथे निघालेल्या विभागीय साहित्य संमेलनाच्या ग्रंथदिंडीमध्ये शहर व परिसरातील बालगोपाळ, विद्यालयीन, महाविद्यालयीन विद्यार्थी बालगोपाळ यांच्या झांजपथकाच्या किलबिलाटाने पाटणनगरीमधील सकाळ मंगलमय आणि साहित्यमय झाली. शिक्षक, साहित्यप्रेमी, विविध संस्थांचे पदाधिकारी, साहित्य परिषदेचे सर्व सदस्य, तालुका प्रतिनिधी, जिल्हा प्रतिनिधी, ग्रामस्थ मोठ्या संख्येने ग्रंथदिंडीला उपस्थित होते.



अनुक्रमणिका



पाटण ग्रामपंचायत मैदानातून सकाळी ९.०० वाजता मा. प्रकाश पायगुडे (प्रमुख कार्यवाह म.सा.प. पुणे ) व मा. सत्यजितसिंह पाटणकर (माजी सभापती पंचायत समिती, पाटण) यांच्या हस्ते ग्रंथदिंडीचे उद्‌घाटन करण्यात आले त्या वेळी डॉ. सोपानराव चव्हाण, प्रा. मिलिंद जोशी, सौ. सुनीताराजे पवार डॉ. एस. डी. पवार, रवींद्र बेडकिहाळ, विनोद कुलकर्णी, प्रा. डॉ. पांडुरंग ऐवळे, प्रा. विनायक राऊत तसेच परिसरातील विविध संस्थांचे पदाधिकारी उपस्थित होते.

**उद्‌घाटन :** प्रास्ताविक संमेलन कार्याध्यक्ष डॉ. सोपानराव चव्हाण यांनी केले. या वेळी डॉ. सोपानराव चव्हाण यांनी 'गाव तेथे ग्रंथालय' व्हावे, प्रत्येक शाळेत एक तास वाचनासाठी शासनाने द्यावा, जेणेकरून वाचनसंस्कृती वाढेल, असे दोन ठराव मांडले. त्याला सर्वानुमते अनुमती देण्यात आली.

या वेळी बोलताना संमेलन स्वागताध्यक्ष विक्रमसिंह पाटणकर म्हणाले, की यापुढे कोणत्याही सणासमारंभात पुस्तके, ग्रंथांचे वाटप करा. पुस्तके, ग्रंथ स्वत: खरेदी करून वाचा.

म.सा.प.पुणे सातारा जिल्हा प्रतिनिधी मा. रवींद्र बेडकिहाळ म्हणाले, की येथे साहित्याला प्रचंड वाव आहे. बाळासाहेब देसाई कॉलेजमध्ये स्वतंत्र साहित्य-कला-संस्कृती दालन व्हावे. येथे येणारे पर्यटक, नवनवीन कवी साहित्यिकांना त्याचा निश्चित लाभ होईल.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष मा. प्रा. मिलिंद जोशी म्हणाले, की भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचारमंत्रांनी क्रांती केली. सध्या महापुरुषांचे स्मरण होतेय, मात्र विचारांचे विस्मरण होतेय, ही शोकांतिका आहे. पुस्तके जीवनात प्रकाश टाकतात. त्यामुळे आंबेडकरी विचारांचे शस्त्र धारदार करण्याची गरज आहे.

संमेलनाचे उद्‌घाटक म्हणून बोलताना रावसाहेब कसबे म्हणाले, की भारत आजही एक राष्ट्र झाला नाही ही अतिशय दुर्दैवी बाब आहे. येथे प्रत्येक जातिधर्माला वाटा पाहिजे आहे. भारतीय माणूस हा कोणावरच प्रेम करत नाही. राष्ट्रप्रेम नाही, मात्र जातीय प्रेम आहे. परंतु किमान माणसाने माणसावर प्रेम केले पाहिजे. येथे प्रेम हे जाती धर्मावर केले जाते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी जाती नष्ट करण्याचा कार्यक्रम दिला होता. जातीवर्णाचे अहंकार झटकून टाका. आपण आपल्याशी भांडले पाहिजे, सार्थ अन् सुंदर जगणे हवे असेल तर साहित्य जपा, असे आवाहनही डॉ. रावसाहेब कसबे यांनी केले.

संमेलनाध्यक्षा प्रा. प्रज्ञा दया पवार म्हणाल्या, की जागतिक पातळीवर सांस्कृतिक दहशतवाद गुन्हा समजला जातो. मात्र आपल्या देशात तो सध्या फोफावत आहे. साहित्यिकांना आपले पुरस्कार परत करावे लागतात यासारखे दु:ख नाही. येथे वैचारिक दहशतवाद घोंघावत आहे. येथे सांस्कृतिक दहशतवादाची मुळे खोलवर रुजली गेली आहेत. आता यासाठी नव्याने लढा देण्याची गरज असून भारताच्या लोकशाहीवर होणारा हल्ला आता सर्वांनी परतवून लावावा, असे आवाहनही शेवटी प्रा. प्रज्ञा दया पवार यांनी केले.

या प्रसंगी महाराष्ट्र साहित्य परिषदेचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, सुनीताराजे पवार, सत्यजितसिंह पाटणकर, डॉ. पुरुषोत्तम काळे, पद्माकर कुलकर्णी, राजन लाखे, ज्येष्ठ नेते तात्यासाहेब दिवशीकर, अमरसिंह पाटणकर (जनरल सेक्रेटरी, कोयना शिक्षण संस्था, पाटण), सतीश कुलकर्णी, कल्याण शिंदे, आर. व्ही जाधव, अ‍ॅड. श्रीधर कसवे, बंडा जोशी, राजकुमार निकम, अ‍ॅड. अविनाश जानुगडे, दिनकरराव घाडगे, राजन मुठाणे, अ‍ॅड. बाळासाहेब जाधव, आत्माराम कांबळे, अ‍ॅड. ए.पी. पाटील, बाबुराव सुतार, आदी मान्यवर, साहित्यप्रेमी राज्यभरातून आलेले लेखक, कवी, वक्ते विविध क्षेत्रांतील मान्यवर शिक्षक, प्राध्यापक, विद्यार्थी बहुसंख्येने उपस्थित होते. शेवटी आभारप्रदर्शन प्राचार्य डॉ. शिरीष पवार यांनी केले. सूत्रसंचालन प्रा. जमीर मोमीन, दिनकर माथणे यांनी केले.

**परिसंवाद : आंबेडकरी विचार आणि आजचे वास्तव**

'आंबेडकरी विचार आणि आजचे वास्तव' या विषयावरील परिसंवादाचे आयोजन केले, त्यामध्ये श्रीधर कुलकर्णी हे अध्यक्ष होते, तर प्रमुख वक्ते म्हणून प्रा. डॉ. सुलक्षणा कुलकर्णी (कडेगांव), प्रा. रघुनाथ केंगार (कराड), डॉ. भारती पाटील (कोल्हापूर) व प्राचार्य यशंवत पाटणे (सातारा) यांनी सहभाग घेतला.

या परिसंवादाचे प्रास्ताविक प्राचार्य गिरिगोसावी एम. जे. यांनी केले. आभारप्रदर्शन श्री. आर. टी. माने यांनी केले. सूत्रसंचालन प्रा. सौ. पी. आर मोरे व प्रा. डी. डी.चव्हाण यांनी केले.

**कविसंमेलन : 'कविता परिवर्तनाच्या' :**

'कविता परिवर्तनाच्या' या कविसंमेलनात राजन लाखे, ज्ञानेश्वर बडवे, बंडा जोशी, रमजान मुल्ला, चंद्रकांत देशमुखे, नीलेश शेळके, प्रा. अशोक शिंदे, मारुती कटकधोंड, माधव पवार, सुहास चव्हाण, कबीर ताटे, उद्धव पाटील, प्रशांत वेळापुरे, डॉ. दिलीप पटवर्धन, सौ. शीला जाधव, अर्जुन नलवडे, लक्ष्मीकांत रांजणे, ज. तु. गार्डे, लता ऐवळे. सौ. मीरा चव्हाण, गणेशचंद्र पिसाळ, प्रा. दादासाहेब चव्हाण, जमीर मोमीन, शफी खतीब, खाशाबा चव्हाण, दादासो सावंत, रवी भिसे, रंजनादेवी चव्हाण, प्रा. चंद्रशेखर विंचू, अनंत विठ्ठल राऊत, किशोर धरपडे, राहुल वराडे, रघुनाथ घाडगे, बाळासाहेब पाटणकर, दादासाहेब पवार, चंद्रकांत भिसे. शेख,

नंदकुमार शेडगे, डॉ. सुभाष मोरे, विजय कदम, भरत लोहार, श्याम भोळे, दिनेश माने इ. नवोदित आणि निमंत्रित कवींनी कवितावाचन केले. या काव्य संमेलनात महाराष्ट्रातून आणि पाटण परिसरातील कवींनी आपल्या कविता सादर केल्या. त्यामध्ये लता ऐवळे यांनी शहरी स्त्री आणि ग्रामीण स्त्री यांच्यामधील वेगळेपण सादर केले. त्याला विशेष दाद मिळाली.

अध्यक्षीय मनोगत मा. विजय चोरमारे यांनी केले. प्रास्ताविक व स्वागत डॉ. आर. आर. पावसकर यांनी केले. आभार आवासाहेब भोळे यांनी मानले. सूत्रसंचालन मा. इंद्रजित घुले व प्रा. डॉ. रामकली पावसकर यांनी केले.

**'आंबेडकरी जलसा' व चित्रफीत :**

रात्री ९ वाजता डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनावर आधारित चित्रफीत दाखविण्यात आली. तसेच राजेंद्र गायकवाड, विजय गायकवाड, भास्कर काळे, आनंदा गुरव, सप्रे सर, प्रज्वल वायदंडे, कांबळे सर या स्थानिक कलाकारांनी 'आंबेडकरी जलसा' सादर केला.

**रविवार दिनांक ०९/१०/२०१६ : कथाकथन :**

महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे, शाखा पाटण व बाळासाहेब देसाई कॉलेज, पाटण यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त विभागीय मराठी साहित्य संमेलनाच्या दुसऱ्या दिवसाच्या सत्रामध्ये रवींद्र कोकरे, जयवंत आवटे, बाबा परीट यांच्या रसाळ व विनोदी कथाकथन कार्यक्रमाचे आयोजन केले होते.

**परिसंवाद क्र.२ - अभिव्यक्ती स्वातंत्र्य व साहित्यिकांची उदासीनता**

'अभिव्यक्ती स्वातंत्र्य व साहित्यिकांची उदासीनता' या विषयावरील परिसंवादाचे आयोजन केले गेले, त्यामध्ये राजन खान हे अध्यक्ष होते, तर प्रमुख वक्ते म्हणून ॲड. संभाजीराव मोहिते (कडेगाव), प्राचार्य डॉ. सयाजीराजे मोकाशी, प्राचार्य, रवींद्र येवले यांनी सहभाग घेतला.

ज्येष्ठ साहित्यिक राजन खान अध्यक्षीय मनोगतात म्हणाले, की जात, धर्म यांनी देशाचे वाटोळे केले आहे. जात, पात, धर्म आणि कर्मकांडांनी आपला देश सडविला आहे. माणसाला जन्मापासून स्मशानभूमी धर्म लागू पडतो. लेखकांनी माणसांच्या वेदनांवर लिहिले पाहिजे. जात, धर्म म्हणजे देशाला सापडलेल्या काल्पनिक गोष्टी आहेत.

या देशात तुकोबा, ज्ञानोबा यांनासुद्धा समाजाने छळले आहे. लेखकांना हाल भोगावे लागतात. एकही जात-धर्म दुसऱ्या जाती-धर्माचा आवाज ऐकत नाही. संविधान वाचा अन् पाळा. तलवारीने लढणारे लाखो असतात, पण बुद्धीने लढणारे शिवाजी महाराज होते हे ध्यानात ठेवा, असेही राजन खान म्हणाले.

ॲड. संभाजीराव मोहिते म्हणाले, की भारतीय राज्यघटनेच्या १९ व्या कलमात स्वातंत्र्याची मूलभूत संकल्पना मांडली आहे. स्वातंत्र्याचे रूपांतर स्वैराचारात होऊ नये. आपल्या मनातील विचारभावना प्रकट करण्यासाठी लोकशाही आहे.

प्राचार्य डॉ. सयाजीराजे मोकाशी म्हणाले, की विचारस्वातंत्र्य हा परमोच्च बिंदू आहे. सर्वांत मोठा संघर्ष हा मनामनांतील अन् माणसांतील आहे. लोकशाही आता अधिकाधिक संवेदनशील होत चालली आहे. जबाबदाऱ्या विसरून हक्क मोठे होऊ लागले आहेत. लेखकाचा शब्द हा समाजात प्रमाण मानला जातो.

प्राचार्य रवींद्र येवले म्हणाले, की अभिव्यक्त होताना दुसरा दुखावला जाणार नाही याची काळजी घ्यावी. सध्या समाज व माणसातला संवाद कमी होत चालला आहे. प्रश्न पेटविण्यापेक्षा ते विझविण्याची किमया आपल्या हातात असली पाहिजे. शब्दाची ताकद जास्त असते. ती समोरच्याला कळावी.

स्वागत व प्रास्ताविक प्रा. विनायक राऊत व आभार प्रा. डी. डी. थोरात यांनी मानले, तर सूत्रसंचालन प्रा. एन. जी. वाले व सौ. ए. बी. जाधव यांनी केले.

**समारोप :** समारोपप्रसंगी मार्गदर्शन करताना महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष मिलिंद जोशी म्हणाले, की साहित्य निर्मिती ही साधी-सोपी गोष्ट नाही. सकारात्मक विचारांची आरास नव्या पिढीसमोर मांडण्याचे आव्हान साहित्यिकांच्या समोर आहे. ग्रामीण भागामध्ये साहित्याची भूक'मोठी आहे. संधी न मिळाल्यामुळे प्रतिभा कोमेजून जाते. समाजाची स्थितिगती लेखणीतून अभिव्यक्त होण्याची आवश्यकता आहे. साहित्य आणि समाज यांचा दृढ संबंध असून माणूस संस्कृती घडवतो. भाषा स्वीकारायची असेल तर भाषा ओठांतून नव्हे तर पोटातून आली पाहिजे. तंत्रज्ञानामुळे यंत्रमानवाचे आभासी जग निर्माण झाले असताना व्यक्तिमत्त्व मूल्ये समृद्ध होण्याची आवश्यकता आहे. गेले दोन दिवस विभागीय साहित्य संमेलनातून प्रतिभेचे अनेक फवारे पाहायला मिळाले. संयोजकांनी अत्यंत कमी वेळेत संमेलन यशस्वी केले. संमेलनातून हाती लागलेल्या उत्तम कवी, लेखकांना अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात संधी देण्यासाठी प्रयत्न करणार असल्याचे मिलिंद जोशी यांनी सांगितले.

या वेळी पद्माकर कुलकर्णी, विनोद कुलकर्णी यांनीही आपली मनोगते व्यक्त केली.

■







# क्षणचित्रे




▲ चाळीसगाव येथे झालेल्या शाखा मेळाव्याचे उद्घाटन करताना प्रा. मिलिंद जोशी व मान्यवर



▲ डॉ. दिलीप धोंडगे यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेले समीक्षा संमेलन पाचोरा (जि. जळगाव) उद्घाटन प्रसंगी मान्यवर.




▲ मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळण्यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे जिल्हा आयोजित मराठी अभ्यासकांची बैठक व चर्चा.



▲ आलेगाव पागा शाखा (पुणे जिल्हा) उद्घाटन प्रसंगी डॉ. रामचंद्र देखणे आणि मान्यवर.




▲ अहमदनगर येथील सावेडी शाखा साहित्य पुरस्कार वितरण सोहळ्यातसंमेलनाध्यक्ष डॉ. श्रीपाल सबनीस आणि मान्यवर.



▲ पुण्यातील कोथरूड येथे डॉ. मंदा खांडगे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या संमेलनपूर्व संमेलन उद्घाटन प्रसंगी मान्यवर.




▲ डॉ. प्रज्ञा दया पवार यांच्या अध्यक्षतेखाली पाटण (जि.सातारा) येथे झालेल्या विभागीय साहित्य संमेलन उद्घाटन प्रसंगी स्मरणिका प्रकाशन करताना मान्यवर

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

संपूर्ण संच ५२५०/- रुपयांत

## संचाची किंमत

| | | |
|---|---|---|
| खंड १ ला : | | रु. ५००/- |
| खंड २ रा : | भाग १ : | रु. ७००/- |
| | भाग २ : | रु. ७००/- |
| खंड ३ रा : | | रु. ३५०/- |
| खंड ४ था : | | रु. ४००/- |
| खंड ५ वा : | भाग १ : | रु. ३५०/- |
| | भाग २ : | रु. ३५०/- |
| खंड ६ वा : | भाग १ : | रु. ३५०/- |
| | भाग २ : | रु. ३००/- |
| खंड ७ वा : | भाग १ : | रु. ७००/- |
| | भाग २ : | रु. ८००/- |
| | भाग ३ : | रु. ७००/- |
| | भाग ४ : | रु. ७००/- |
| | | एकूण रु. ७०००/- |

**शाळा, महाविद्यालये आणि व्यक्तिगत ग्राहकांनाही रु. ५२५०/-**
**डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच** आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस.टी. पार्सलने पाठवू. (वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट. व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपालखर्च वेगळा.)



मागणीसाठी संपर्क : **महाराष्ट्र साहित्य परिषद**, टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०. दूरभाष : ०२०- २४४७५९६

बुक-पोस्ट


प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३



Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : December 2016
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/5
Book Pkt. Periodical Category






अनुक्रमणिका

